मुद्रक,

लक्ष्मण भाऊराव कोकाटे यांनी ' हनुमान '
प्रेस, सदाशिव पेठ घ. नं ३०० पुणें येथें छापिलें



प्रकाशक,

सारस्वत प्रसारक मंडळी करितां गो. गो. अधिकारी
यांनी ७७० सदाशिव पेठ पुणें येथें प्रसिद्ध केलें

# चार शब्द



आधुनिक कवींची कविता प्रकाशांत आणिल्याचें श्रेय गेल्या वीस पंचवीस वर्षांकडेसच असून जुने पवाडे व लावणी यांचें वाङ्मय याच कालांत प्रकाशित झालें, ही मोठी समाधानाची व अभिमानाची गोष्ट होय. नांव घेण्यासारखे बहुतेक शाहीर आतां छापून हातावेगळे झाले असून नजरेआड असलेला सगनभाऊचा काव्यसंग्रह आज प्रसिद्ध होत आहे.

पराक्रमाच्या क्षेत्रांत जी कामगिरी पवाडयांनीं केली तीच कामगिरी लावण्यांनीं तेव्हांच्या वीरांची हौस भागविण्यांत केली–हाच लावण्यांचा विशेष. मराठयांच्या ऐन उमेदीच्या काळांत रग आणि रंगेलपणाला रस-वंतीची जोड मिळाल्याबरोबर लावणी निर्माण झाली. आणि तिचें कोडकौतुक तेव्हां यथायोग्य झालेंही. बारीक व भेदकदृष्टि नेहमीं जागृत ठेवणाऱ्या या शाहिरांनीं त्या वेळेस शोभणारी अशींच लौकिक कवनें गाइलीं. नित्यांतील चित्रें हुबेहूब वठविण्याचें त्यांचें शिल्प आणि उठावदार रंगांचा योग्य उपयोग करण्याची त्यांची हातोटी आजही वाखाणण्यासारखी वाटते, याचें कारण त्या चित्रांत त्यांनीं सहज ओत लेला जिवंतपणा हेंच होय.

आजचा काल सरदारी–शिलेदारीचा नाहीं. पण दूरवर पसरलेल्या धुक्यांत अजूनही दिसत असलेलीं अस्पष्ट गतवैभवें न्याहाळावीं व मनांत तें जुनें वैभव जागें करावें व गावें–असा आहे. मराठमोळ्या विचारांचें वळण शाबूत, वैशिष्टय कायम आणि भविष्य काळाविषयीं प्रबळ आशा व आस्था–असा हा काळ आहे.

म्हणूनच या चालत्या काळास पोषक असलेली अशी जुनी शाहिरी

रसवंती आवडीनें वाचली जाते. बाहेर असा समज आहे कीं, हें वाङ्मय प्रतिष्ठित लोक वाचीत नसावेत; पण तसें नाहीं. मराठी हृदयाची घडण वरून ताठर पण आंतून अत्यंत कोमल व भावनाप्रधान अशी आहे. वरील लोकभ्रमाचें कारण वाङ्मयांत वावरणाऱ्या सटरफटर व्यक्तींचें उसनें तेज पडत नाहीं आणि अशा शिष्टांकडून प्रसंगविशेषीं शाहिरी वाङ्मयावर होणारा हल्ला हेंच होय. शाहिरी व लावणी वाङ्मयास जवळ करण्यास राष्ट्रांत जो एक ताठरपणा लागतो तो अजून नाहींसा झाला नाहीं व यदाकदाचित् नाहींसा व्हावयास लागला तरी हें शाहिरी वाङ्मय तो ताठरपणा जिवंत ठेवण्याकरितां शिकस्तीचा प्रयत्न करील—अशी ह्या वाङ्मयाची योग्यता आहे. याची प्रत्यक्ष जाणीव जुन्या पिढींत अजून कायम असून नवी पिढी तीच परंपरा वाढत्या प्रमाणांत फैलावीत असल्याची साक्ष आधुनिक काव्यवाचकांस द्यावयास नको. याचकरितां आम्ही या जुन्या वाङ्मयाचा पुरस्कार पूज्य—बुद्धीनें करीत आहोंत. याचा अर्थ असा नाहीं कीं, या जुन्या शाहिरी वाङ्मयांतील प्रत्येक गीतास आम्ही उचलून धरितों. जुन्या व नव्या अनिष्ट आणि घातुक चालीरीतींकडे ज्या कडव्या दृष्टीनें महाराष्ट्र बघत आहे त्याच दृष्टीनें या वाङ्मयांतील अश्लील भागाकडे आम्हीही पाहातों.

प्रस्तुत पुस्तकाचा कर्ता सगन, हा मूळचा जेजुरीचा. पण याचा बराच मोठा काल पुण्यांत गेला. याची विश्वसनीय माहिती तितकी उपलब्ध नाहीं. या शाहिरानें शेवटल्या बाजीरावाची कारकीर्द प्रत्यक्ष नजरेनें पाहिली आहे. हा स्वतः निष्णात असा शिकलगार होता. तरवारीच्या धारेला पाणी देणाऱ्या सगनभाऊचें तुणतुण्याच्या तारेवरील प्रभुत्व तितकेंच वाखाणण्यासारखें होतें खास. त्या वेळच्या रसिक—समाजांत सगनाचें तेज चांगलेंच चमकत असलें पाहिजे. कारण, त्यावेळीं नांवाजलेल्या प्रतिभासंपन्न होनाजी—बाळा बद्दल.

**' होन्या गवळ्याचा झाला चुना '**—म्हणणारा हा घमेंडखोर शाहीर विख्यातच असला पाहिजे, एरव्हीं असे उन्मत्त व गुर्मीचे शब्द ह्यानें वापरले नसते, व रसिक समाजानें ते वापरूंही दिले नसते. श्रृंगारिक लावण्या लिहिण्यांत याचा हातखंडा आहे. स्वतंत्र विचार व मनोहर कल्पना यांची सांगड याच्या कवनांत जागोजागीं विपुल आढळते. अनेक प्रसंगीं याच्या अश्लीलपणाबद्दल मात्र तिटकाराच येतो. पण हा अवगुण त्या काळीं फारच बोकाळलेला होता. व या दोषापासून बराचसा प्रतिष्ठित समाजही वगळला गेला नाहीं असें तत्कालीन इतिहासावरून सिद्ध होतें. या अश्लील गीतांचा वचपा सगनानें.
**' भाऊ नाना तल्वार धरून गेले गिलच्यावर चढाई करून '**
या एकाच थरारून सोडणाऱ्या पवाड्यानें सव्याज भरून काढिला. याशिवाय याचे इतर दोन पवाडे प्रसिद्धच असून त्यांतही त्याची प्रतिभा उठून दिसते. हा जातीचा मुसलमान—पण यानें अनेक प्रसंगीं आमच्या देवदेवतांचे दाखले मार्मिकपणानें दिले आहेत. याबद्दल त्याचें कौतुक केलेंच पाहिजे. स्वतःची भाषा भिन्न असूनही मराठी भाषेवर मायभाषेपेक्षांही कांकणभर अधिक प्रेम केलें हें पाहून मराठी भाषेचे निस्सीम भक्त सगनाबद्दल कृतज्ञता दाखविल्यावांचून केव्हांही राहणार नाहींत. याच्या कवनांतील सुंदर स्थलांचा नामनिर्देश करूं गेल्यास चोहोंकडेच बोटें ठेवावीं लागतील. तेव्हां न ठेविल्यानेंच हें कार्य अधिक करितां येण्यासारखें आहे.

असो, प्रस्तुत सगन—भाऊच्या कवितेस इतर प्रतिभासंपन्न शाहिरी वाङ्मयाप्रमाणें मराठी रसिकवर्ग आपलेपणानें जवळ करील अशी आशा प्रदर्शित करून रसिकांची आम्ही कांहींकाळ पुन्हां रजा घेतों.

६८३ सदाशिव पेठ,
शांतिकुंज पुणें.
१९ आगष्ट १९२४.

दिनकर गंगाधर केळकर

# अनुक्रमणिका.



# सगनभाऊच्या लावण्या

## लावणी पहिली

( राग पुरवी )

चालः——कधि येशील भेटशील प्रित तपशील सांगशील तरी——

होनाजी बाळ.

प्राणसख्या प्रियकरा करा शेवट पुरता मनीं धरून
बाळपणींचा मित्र तुझ्या सद्‌गुणास जाईन मरून ॥ ध्रु० ॥
रूपस्वरूप साजिरा जसा अमृतकर तारांगणा
झळकतात नव लक्ष अधिक शोभतिल ते किरणा
पूर्ण कळा सोळा भरता भर किती नक्षत्र जसा
ये भरते सागरा चतुर भेटले धांवे त्याग ना
॥ चाल ॥ तुझ्या प्रीतिची आवडी म्हुन पडले झडी
नको प्राणसख्या विसरूं मजला पळघडी
ने उतरून पइले थडी लागले चडी
पाहून खोल सागर घातली उडी
धर हाति फुलाची झडी म्हुन नार ओढी
तूं प्राणहंस मीं कांचन काया कुडी
तूं कल्पवृक्ष मी छाया तुज तळवटीं
जोडिली प्रीत मुणीजना शेवटीं
मी मुलतानी कमान कसुन कसवटी
मी एक बंगाली मैना अशी
नामनगरच्या राया मी भुलले तुशी
पांची प्राणापासुन जिव खुसी

बोला गुजगोष्टी हरुषें मसी
कवळी नवती माझी लुसलुशी
तारुण्य निमोनी आली रसीं
भर नवतीचा बाहार रुताचा पाहा नेत्र भरून
नानापरिचीं पुष्पें सुकतीं सुवास येइना फिरुन १

प्रित चाल्लूं द्या सदा कदामधें अंतर पाडूं नको
जिव करिन खुरवान तुझे मन राया कादुं नको
हातिं धरल्याची लाज आज मज हातचे सोडूं नको
जन करिती कावळा पराचा भरम फोडूं नको
॥ चाल ॥ या इथल्या रांडा मुढा लावतील चढा
गुणी समुण बघुन दोघांत पाडतिल तडा
मी नागिण घालिन झडा तूं एक केवडा
पाहून सद्‌गुणी जीवीं चिखलीं रुतला खडा
मी वावडी तूं एक सडा नको मारु आढा
झडूं दे इष्कि नौबद वाजिव चौघडा
मी देहे कांटें तूं जिवलग माझा हुडा
जाई जुई चमेली तूं गेंद भरला पुडा
तुसाठीं सतीचे बाण जिवाचा धडा
गुणी रे मानसा समुण नीर्मळा
माझ्या ममतेचा असुं द्या लळा
येऊं दे चित्तापासुन कनवळा
नाहीं तर दे झरका कापा गळा
कवळून जीवलगा मी पडते गळा
पुरता ममतेचा असुं द्या अळा
मी आपुले सीरकमळ कापुन उभी हस्तकीं धरून
भरुन प्राण पायडे तुला मी अर्पण करिते तरून. २

मज कमळणीवर पहिल्यापासुन इच्छा तुझी मधुकरा
या गोष्टीची याद असूं द्या पुर्तो शेवट करा

पतंग ज्योतीवर झडा घाली मनिं नाहिं त्याच्या खरखर
म्हुन तरी डामाडौल करूं नये आपला प्राणप्रियकरा
॥ चाल ॥ चळ सुटला माझ्या मना मला राहवेना
घडोघडीं धांवत येते तुझ्या दर्शना
माझ्या निधना धना नको धरू कुऱ्हां
इष्कामधें लंपट भुलले चांगुलपणा
नाहीं भुलले तुमच्या धना मी वाहते आणा
प्रीतिची मजला जाहली तुझी झडपणा
मज आवळ कवळ कवटाळुन नको घेउं जना
प्रियकरा सख्या मम नेत्रींच्या अंजना
गुणी प्राणविसाव्या जिवलग मनरंजना
माझा जीव प्राण लागला झुरणी
तुमच्या वोंजळिनें पीते पाणी
क्षण एक पाहताना होय सुराणी
माझे सीरीं छत्र मी तुमची राणी
आज्ञांकित आहे मी तुमचे मनीं
सख्या रे मी झुरते मोरावाणी
मज जीवनीं मासोळी उल्हाळ घेती प्रीती करून
मी चातक तुम्ही मेघ लक्षवर बिंदु सोडा वरून २

नीत करिता यायास मला म्हणता एकांतीं चला
मनीं विकल्प विट नाहीं आजवर चालत आला सला.
एकांतीं गुजगोष्टी करि कवटाळून धरिता मला
म्हुन काय कुरवंडी करून मी घेते आलावला
॥ चाल ॥ रंगमहाली शेजेवरी नानापरी
आनंद भोग विलास हर्ष अंतरीं
चुवा चंदन कस्तुरी हो मैलागिरी
अत्तर गुलाब रमतो सुवास सागरीं
केकती मालती कर्पुरीं पाहा हरोहरी

दवणा मरवा मोहिकती मंचकावरी
पिवळी कवळी नागवेल नट नागरी
वेळा लवंगा नित चिकण चौफुले भरी
अशी सजुन उभी शेवेत कळा कुसरी
सगनभाऊ म्हणे अशा सुजाती
इष्की इष्कामधें मरून रहाती
महादेव कविराज पुण्यामधें राहती
त्याचे छंद ऐकुन गुणीजन गाती
बदलुन अंतरींमग उलटे वाहती
तोंडीमधें छानपछान करती
आभंग बदलतील कवि सोदे पाहाती ऐसे आंथरूण
भेसळ उणी वीर्याचा म्हणती मग राहती चुरमरुन. ४

# लावणी दुसरी

( राग लीलांबरी )

चाल:--सहज मनामधि आले साजणी कधि स्वामिचा ॥

होनाजी बाळ

अर्ज विनंती ऐका लोभ हा साळू स.सऱ्याला जाते
सख्या मला मूळ आले नाहि तरी एकमास आणखी रहाते
मुळ.रंभीची कथा सांगते ऐकुनि घ्यावी गुणवंता
सहज आले यात्रेस गांठ अवाचित पडली लक्ष्मिकांता
नेत्र भरून न्याहाळिले तुम्हांला आनंदले चंद्र पाहता
त्या संगें प्रीत घडो असा कधीं पावशिल पंढरीनाथा ?
नाभीकमळापसुन इच्छिले जेव्हां तुम्हि मजकडे पाहतां
खुशि झालो एकमेकावरती गांठ कशि पडेल एकांता ?
मरयादा सोडुन विचारिले नगरामधें तुमच्या राहते
प्रीतीची लक्षणें जाणता प्रीत करशि वाटते ॥ १ ॥
आज्ञा वंदुनी आले प्रियकरा चालत अनवाणी पाईं
फोड आले तळपायाला सुखलक्ष आहे तुमचा ठाईं
दिपवेळीं दिपसमयीं शहरामधें उतरले गुणग्राही
वरतमान लिहुन पाठविले सांगा सख्याला लवलाही
ऐकतांच राजश्री उठले आनंद हृदयीं न माई
दृष्टभेट होता आधिच फुरफुरली डावी बाही.
पहिले दिवशीं रात्रौ समयीं एकांत निर्भीड जेथें
प्रसन्नता मर्जि उभयता इष्की सागरा आले भरते ॥ २ ॥
इतकें असुन साजणीं युक्त घुडली सांग कशी
प्रितिचे उत्तर कांहीं सुचेना वेधले या शरिराशी
ऐकुन घ्यावे राजपुत्रा मिष्ट बोलते आपणाशीं
वचन उगवले तुमचि कल्पना पुढें कशाची गुणराशी
हर प्रयत्नें पडेल प्रियकरा रंग म.ह.ली सुख सेजेशी

विडा कोणाचे हातचा घ्यावा दुर केले घरले स्त्रियेसी
तुं लग्नाचा जोडा जैसा निर्मळ गंगाजळ वाहते
आम्हासारख्या उद्दंड मिळतिल भवताले खाते गोते ॥ ३ ॥
गौरविले स्वामीला घेतला निरोप विषय आंवरेना
पाकस्नेहा मध्ये अंतर नाहीं साक्ष पंढरीराणा
तुमचा शहरामधें नांदतो परदेसिं नाहीं सजणा
जेव्हां जिवाला वाटेल तुमचा आतां पाहिजे गुणगहिना
तेव्हा स्वार अश्वावर होऊन दरकुच गेले निजभुवना
बोलवित चालले राज बनसीच्या तुर मोती दाणा
ज्याच्या आंगीं इष्क बिंबला तो समजेल वर्म पुर्ते
सगन भाऊ म्हणे इतर पुरुष रसभोगी सूज्ञ ज्ञाते. ४

---

# लावणी तिसरी

( राग संकीर्ण )

चालः—सूरतपाक देखणा पुरुष ऐसा ॥ अमृतकर वाट्या.

होनाजी बाळ

नवे पाखरूं जा गबरुहि लवा । रंग हवा आणवा लाहान छिलवा ॥ धृ० ॥ हिरेखाण दिनमान तेज भाळीं ॥ कटि कसुनिया चंद्रकळा काळी ॥ गोरा रंग खुषरंग ओठ पोवळी ॥ गेंद बुंद सुगंध कळी पिवळी ॥ चमकनोक नेत्राची आग जाळी ॥ विष पसरले भिन्नले जिव्हाळीं ॥ चाल ॥ पाहुनि चित्त मन हे गार प्रियकरणी ॥ तुं भला मारला वार प्रियकरणी ॥ पडदा अंतरिचा पार प्रियकरणी ॥ जणु बाड चीरिचा वार प्रियकरणी ॥ झालो होतो ठार दिला कलवा ॥ १ ॥

नागिण जहरी डंकीली वर्मीं । विषय उष्णता चढली आंगीं गर्मी ॥ मुहूत केव्हां लागल भर्माभर्मी । टणकला जीव जाहला लइ शरमी ॥ भाग्यवंत कंठा बरते सुरमी । अशि सुगंधिक दवण्याची तुरमी ॥ चाल ॥ रंगिती बत्तीशी लाल प्रियकरणी । तरतरीत गोरे गाल प्रियकरणी ॥ चाले मस्त गजाची चाल प्रियकरणी । थरकावी नथनीचा लाल प्रियकरणी ॥ इचा पायिं दौलत सारी डूलवा ॥ २ ॥

रंग गुले नार वय द्वादश वरूषा । उरी उसासले गेंद लाहान गरसा ॥ नयन तडाके छातिमध्यें तिरसा । धिले गिरावुन सोपटले फरसा ॥ आग भडकली धमकी परपुरुषा । लावुनि गेल्या अपसामध्यें चुरसा ॥ चाल ॥ आज घेउ पाहाती प्राण शरतीनें । ही हिंडवील रानोरान युक्तिनें ॥ घालुन गळयाची आण अगतीनें । जा भिडून छाबिल्या जान जगातिने ॥ लालुच द्रव्याची दावुन भुलवा ॥ ३ ॥

शब्द गुणिचे मिठडे ऐकता । मान्य वचन हें आज एक मक्ता । लाच कशाला भरता खंड मक्ता । मुठि भरून पैसा मनमुक्ता ॥ चमकुन पठीया दे झोंक अुकता । बाहार लुटूं दे जाईचा तक्ता ॥ चाल ॥ घ्या उत्तर आपले स्वस्त राहावे तुम्हीं । वरकांती करता कष्ट रावहो तुम्हीं ॥ विसराळ घराची गोष्ट राव तुम्हीं । तृप्त व्हाल जेउन मिष्टराय तुम्हीं ॥ प्रिय उभयता ताजव्यात तोलवा । सगन भाऊ म्हणे चौपाळा हालना ॥ रंग हवा आणवा । लाहान छीलवा ॥ ४ ॥



# लावणी चवथी

( राग झाम. )

चालः—लावण्य गुणाची खाण पति मज दावा गे बाई.

होनाजीबाळ

ऋतु चौथा गे बाई ॥ तारुण्य रुपाशीं काय करूं ॥ धृ० ॥ मज भुलविलेल्या भ्रमरानें ॥ होती जिवाची लाही गेल्या ठायीं ॥ १ ॥ परि मी चाहातें चातक पक्षा ॥ यामधें संशय नाहीं साक्ष विठाई ॥ २ ॥ येउन वसतो मज शेजारी ॥ नाहीं बोलत देसाई मला त्या ठायीं ॥ ३ ॥ येउन पलंगी राजस रूपडे ॥ रंग विलास त्या ठायीं रामजी गायीं ॥ ४ ॥

———

# लावणी पांचवी

( राग भैरवी )

और नये तुम प्रित ।। लगालो हमे सताना

होनाजी.

असीं किरे प्रित वाढल किर्त अनांत न होय हासी ।।
सख्या रे अपुली पत अपुल्या पशी ।। धृ० ।।
माय बापाचा लौकिक राहिल असे कांहीं साधन करा ।
पुढील धूर्त वाजरी कांहीं धरा ।।
पर नारीशीं भाषण करिता विचार नाहीं बरा ।।
आधिच आहे तुमची छबेली तऱ्हा ।।
स्वरूप तुझें चांगले फिरू लागतिल तेव्हां गरगरा ।।
झोंबतिल बळं तुमचा पदरा ।।
आबरूस बट्टा होइल थट्टा पडशिल दांत घसीं ।। १ ।।
भाउबंद सोईरे गणगोतांत असावा ठसा ।।
उगवला सूर्य गगनीं जसा ।।
दुपारची सावली नाहीं धन दौलतिचा भरवसा ।।
काळ कंठावा चालेल तसा ।।
आली दुनिया उफराटी फार तुम्ही सावधगीरिनें असा ।।
चांगला ठिकाण पाहुन बसा ।।
ह्या रांडा घरघालया सख्या तूं पडशी दांत घशी ।। २ ।।
मोत्यासारखे तेज आपली आबरू दवडू नका ।।
भरम चौघामधीं फोडूं नका ।।
वाणी उदमी सावकार दुकानदारी तुम्ही मोडू नका ।।
कुणाचे कर्ज तुम्हि काढूं नका ।।
श्रीमंताचे दरबारीं येणें जाणें सोडूं नका ।।
जोडला आश्रय तोडूं नका ।।

सत्य बोलावें वचन लागु नये खोट्याचे संगतीशी ॥ ३ ॥
पत गेल्यावर लक्षाधिश सावकार असला जरी ॥
कोणा इत बार याचा घरीं ॥
ऐसे समजून चित्तीं उमजून शोध करा अंतरीं ॥
पुढला विचार पहावा तरी ॥
बाळा राघु म्हणे खरें त्वां सांगितले सुंदरी ॥
गोष्ट ही ठसली हृदयांतरीं ॥
सगन भाऊ म्हणे वसु नये सिंदिचे छायेशी ॥
सख्या रे अपुली पत अपुल्या पशी ॥ ४ ॥

---

# लावणी सहावी

( राग पहाडी )

चाल:--नुतन वय दोघांचे सारखा जोड। गे बाई.

होनाजी

मज पापिणीची दृष्ट सख्याला लागल गे बाई ॥
सीताकांत रघुनाथ पती मज जन्मावर देई ॥धृ०॥
अधिच रंग सावळा करुन पोपाख भरजरिचा ॥
मुखी सूर्याची कळा जसा कां पुतळा मदनाचा ॥
राज वनसी बावरा मुशाफर अमदा नगराचा ॥
ती उपमा शोभे रायाला सत्य वचनाचा ॥
छेल वटाऊं मोहोना राणी जोडा इष्काचा ॥
तशी प्रित उभयता आनंद चित्ताचा ॥
मिच अशी दैवाची पार मज भाग्यासी नाही ॥ १ ॥
आम्हि कुळीच्या स्त्रिया जातिवंताच्या गुणगहिना ॥
चित्ता जोगा पति राज बनसी राजिवनयना ॥
पट्टराण्या भवताल्या मध्यें मी चंचल मृगनयना ॥
पताजाता कवळून धरता मैलागिरि चंदना ॥
चौ प्रहराचे चार करून शृंगार मनमोहना ॥
उभी राहाते सन्मुख मनासी आनंद माईना ॥
माझ्या मनची आवड सख्याची होऊं कांहीं उतराई ॥ २ ॥
मान्यमान्यता करून मोहिले त्या पतिरायाला ॥
प्रित ठेवाल की मजवर लागेन तुमच्या पायाला ॥
नेणतपण आलडपण बसो उभयता न्हायाला ॥
हात टाका छातीवर लुब्धते तुमच्या पायाला ॥
करा चुनडी पोषाख शुभ्र पातळ नेसायाला ॥
माझ्या मनची आवड असावी पतिच्या शेवला ॥
मी आपला जिवप्राण करिन खुरबान या ठायीं ॥ ३ ॥

नाना परिचे विलास करि ते त्या रंगमाहालांत ॥
कवटाळून सजनाचा धरिला एकान्ती हात ॥
जाईजुई मोतिया शेज पुष्पाची खुप वक्त ॥
करून सोळा शृंगार कपाळीं कुंकू शोभत ॥
वचनीं गोउन सजण भोगिला मोत्याची जात ॥
स्वरूप पतिचे चांगले मिळाली जोतिस जोत ॥
सगनभाऊ कविराज नित्य प्रसंगांत गाइ ॥ ४ ॥

# लावणी सातवी

( राग ललतागारी )

चालः—आधिच छेली सुरत त्यावर तुमची—

होनाजी.

नाजुक माझें आंग नवि नवती । आला चांगुलपणा चल बागा-मधिं सज्जना ।। धृ० ।। गोड साखरेचा लाडू—तशि प्रीत आलि की रसा । तुम्ही या इकडे राजसा ।। जसे गुलाबी फूल गुलबसी रंग गुलाला जसा ।। लाल सुरेख मुखडा तसा । सम समान आकृती तुमचि आमचि प्राणहंसा ॥ गोड गोड द्राक्षाचा घोसा ॥ अलाबला किति घेऊं परंतू नको जाऊं आंबे वना । फेड चित्ताची कलपना ।। १ ॥

तसूतसूची घेउनि बेतणी तक्के बांधले सुती । आंत झडे ना नारि ती ॥ गुलछबू गुलटोप मोतिया मोगरा शेवंती । नारंग्या खिरण्या तुती ।। जाईजुई रातांजन वटमोगरा आणिक मालती । दौणा गुलाब केकती ॥ ज्या पुष्पाची आवड तुम्हाला शेज करिन सज्जना । सुख होइल अपुल्या मना ।। २ ।।

हिरवे कांठ पैठणचे पातळ दोन्ही पदरा हात हात । हिरवी कंचुकी मजबुत ।। तेजस्वी शृंगार करून मी ल्याले साधी नथ । जणुं आली चपला चमकत ।। इष्क पुरा करणें आसल पोषाख करावा इथ । शांत होइल आपले चित्त ॥ सर्वस्वी मी दासी पदरची आहे तुमची गुणी जना । हा वक्त येइना पुन्हां ।। ३ ॥

प्राणसखे राजसे रोज गडे तुझा मनाच्या ओढी । आम्ही तृप्त करूं या घडीं ॥ बागामधिं घेऊन गेली छेलछबीला गडी । लाजून उभी फांकडी ।। सुरत कशी शोभिवंत पुष्प तुरा गुफून नवलडी ॥ खोविला शिरीं तातडी ।। सगन भाऊ म्हणे भोगूं पर नको विसरूं मैतर जुना ।। रामा समजेल या खुणा ॥ ४ ॥

———

# लावणी आठवी

## ( राग अहंग. )

चाल:—कमळणीस मधुकर जैसा तैसे तुम्ही मजला० ॥

होनाजी.

सुख असतां दुःख मज देता मी कुळीवंताची कांता.
रूप लावण्य दुसरी पाहाता ॥ तुम्ही कां हो तिच्या गृहिं राहाता॥धृ०॥
रूप स्वरूप तुझे पाहुनिया ॥ मन घाले आले धावुनिया
आज माझे मन मोहुनिया ॥ कसे जाता दिप मालउनिया
चातुर सुगर पाहुनिया ॥ भ्रांतिची गुढी खोलोनिया.
स्वप्नांत मूर्ति पाहुनिया ॥ मन रिझले तुम्हास पाहाता ॥ १ ॥
तसबिर लेहुनिया ठेवते ॥ मन माझे प्रसिद्ध होतें
धाउनिया तुम्हाकडे येते ॥ फंदीच्या रूपाला चाहाते
द्रिष्ट होईल पलंगी नेते ॥ मसी भोग बसुन एकांते
मसि ध्यास लागला तुमचा ॥ सोडून आता कुंठ जाता ॥ २ ॥
म्या आशावंत स्वामिची ॥ पूर्वीची अस्ता मनिची
उभयता जोड प्रितिची ॥ शोभन धुळि पायाची
आलि घटका वेळ ऋताचा ॥ घ्या साधुन घडि लाखाची
लोभ नाहीं तुजवर सत्ता ॥ दिस गेले पाहाता पाहाता ॥ ३ ॥
झड पडोनि गळा आज पडले ॥ तुम्ही लाल मि लालडी जडले
लई दिवसा सजन सापडले ॥ छातिवर गेंद थरथरले
आज मजकडे येणें घडले ॥ कसी सोडू तुम्हास भिडले
भाउसगन गुणीजन गाती ॥ आज भजा तुम्ही सिद्धनाथा ॥ ४ ॥

———

# लावणी नववी

## ( राग श्यामकल्याण )

चाल:—याची माझि प्रित्य कधि जडल जडल. ॥

होनाजी.

तुसी जो स्नेहसंग करिल बुडल बुडल बुडल बुडल ॥ धृ० ॥ न जाणसी प्रित कदर ॥ वरकांती करिसी आदर ॥ द्रव्यावर ठेउनी नदर ॥ सहा महिने झाड पदर ॥ लागता हे सदर ॥ कार्य नडल नडल नडल नडल ॥ १ ॥ तव लक्षण दिसते कसे ॥ शंखिनी वधुलागी जसे ॥ त्यावर तीळ जास्त असे ॥ विधि भाळी लिहीले तसे ॥ पाहुन असे फासे ॥ हरण पडल पडल पडल पडल ॥ २ ॥ करू पाहसी संग बळे ॥ स्त्रिचे मन कोणा कळे ॥ या कर्मी पुरुष बळे ॥ धैर्य तेज अवघे ढळे ॥ चळ विषय पिसे ॥ त्यासी जडल जडल जडल जडल ॥ ३ ॥ परद्वारे फजीत किती ॥ रावण लंकाधिपती ॥ झाली त्याची कोण गती ॥ बहुत असे आति रती ॥ भ्रष्ट मतिरातिस ॥ कैसी चढल चढल चढल चढल ॥ ४ ॥ सगन भाउ म्हणे प्रमाण ॥ ठेविल जो हेंचि ध्यान ॥ सर्वदा निभेल छान ॥ आडेल कसा रामबाण ॥ कान्हु गुणवान मार्तंड ॥ किती रडल रडल पडल चिडल ॥ ५ ॥

———

# आम्ही न बोलु

## ( राग धनासरी )

चालः—आम्ही नाहीं रतलो कधी सख्ये तुजपासी,

होनाजी.

आम्ही न बोलू आजपुन गडे फिरून तुजसंगे ॥ गुणिवंत स्त्रियाचे गुण वेगळे वर्ततात सत्संगें ॥ धृ० ॥

नव महिन्यातुन नऊ दिवस नव्वे मासीं ॥ काय विषय प्रित पाहण्यांत आलि विशेषी ॥ अंग सांग मित्र नको तुझा गुण राशी॥ दिवसांतुन एक घडी द्यावी आम्हासी॥ एका फळास नाही ठिकाण भोवते लागे ॥ १ ॥

सत्मार्गाचे दृष्टांत ऐकून घेणे ॥ जयदेवस्वामीमहाराज तयाचे स्त्रिनें ॥ मृत्यु पावली ऐकून सोडिला प्राण ॥ चोविस अष्ट-पद्या म्हणोन उठविले जाण ॥ शोधकते आणविती धन्य सौभाग्य ॥ २ ॥

आत्मराज तेथून एक माहित सर्वांते ॥ काय बाच्छाय काय गरिब सुज्ञ झाले ॥ जिवा न जीव सारिखा शोधून पाहते ॥ उत्तर सुचेल तर बोल नको खाऊ गोते ॥ च्याऱ्ही वाटा मोकळ्या येईल कोण मार्गे ॥ ३ ॥

वाहिली ती गंगा खरी राहिलें तीर्थ ॥ बोलणे येथुन संपले झाला नाहीं अर्थ ॥ या इष्काचे पाई बुडाले समर्थ ॥ वरकांतिच्या प्रितीनें होईल मात ॥ म्हणे सगनभाऊ सावध व्हा असावे जागे ॥ ४ ॥

———

# चाल तुझी मराठि मोळ्याची

( राग कल्याणी )

चाल:—नको दुर देशी जाऊ सजणा हुरहुर करतो.

**होनाजी.**

नांव तुझें साळू चल आज खेळू उभी द्वारी नार नखऱ्याची ।
चाल तुझी मऱ्हाठ मोळ्याची ॥ ध्रु० ॥
नको वर पाहु दुरदुर जाऊ गांठ पडली आज बोल जरा ।
प्रितीचा लाउन तोरा ॥
नाकिं नथ हलती नागिन डुलती श्रृंगाराचा काय नखरा ।
कधिं होइल संकेत खरा ॥
फार दिस झाले न्हाण तुज आले करू दे गडे आज इष्क पुरा ।
सुभक चांदण्यामधें ठरा ॥
काधिं गडे येसी भेटून जासिल खुणगांठ आपले आंतरची ॥ १ ॥
कुंकु कपाळीं राजसबाळीं बांधा बिन अरवा ॥
बुचड्यामधें खोऊन मरवा ॥
पेंडे तन्मणी जीवलग गडणी शालु नेसुन आज हिरवा ।
सजणाकडे मोहरा फिरवा ॥
घडिभर जाऊ दर्शन घेऊ बोलू त्यासी बेपर्वा ।
भेट सख्याची आज कर्वा ॥
लई मन मिळले नाहीं कधीं टळले आण घाला माझ्या रक्ताची॥२॥
चंचळ मैना बांधुन पैना आली सजनाला भेटाया ।
चला उभयता रंग पाह्या ॥
राजसरूपडे जिवांचे ठिकडे भेटतांच लागन पाया ।
आहे मजवर त्याची माया ॥
आड पड्यानें बहु युक्तिनें मुख कुर्वाळिन पतिराया ।
तप्त शरिर जाहली काया ॥
घ्या मांडीवर मला हो कवळून आग्न जाहली आज विषयाची ॥३॥

रंगमहालांत पलंग फुलात गुलाबदाण्या तबके भरून ।
उजवा हात स्वामिचा धरून ॥
आडपडद्यानें बहु युक्तीनें सजन मोहिला प्रिती करून ।
आनंदवृत्तिनें बसा ठरून ॥
राग रंग नित्य असावा नार सजनाचा पदर धरून ।
गाई सगन चाल करून ॥
प्रित उभयता मजवर ममता असावी या प्रभुरायाची ।
चाल तुझी मऱ्हाट मोळ्याची ॥ ४ ॥

# जीव प्याला वारा

(राग भूपाळी )

चाल:—वरकांतीचा लोभ दावुनी लावलिस माया० ॥

**होनाजी.**

सुख असल्यावर दिना सारिखे कां भौती फिरते। घोकण्या करिते॥
सवाई राजेंद्राला सख्याला नित्य आर्जि करिते । हृदई पद् स्मरते ॥
सत्तेपुढे शहाणपण माझें कांहीं चालेना ॥ म्हणे कामिना ॥
माझा केवा काय परंतू फटकुन राहावेना ॥ ऋताचा महिमा ॥
ऋतु प्राप्त जाहल्यावर तेव्हां तुम्ही राजिवनैना ॥ करून हर वहाना॥
झटपट जाता निघोन नोक मारून पांचिप्राणा ॥ असें का सजना ॥
छेल बटाऊसाठीं निघाली सति राणी मोहना ॥ शहर निमोना ॥
सारी अमदाबाद् वघाया लोटली सैना ॥ इष्क नागिना ॥
तसी आवड रायाची असावी असुन मजवरते ॥ फार मी झुरते ॥
नासीवंत निसिद्ध शरीर चक्क महालमाडी ॥ वस्ती वाडी ॥
संपद् संतत भरून उरली सुंदर रथगाडी ॥ राहिना काडी ॥
पात्रा नाटकशाळा पसंत चातुर्य पवाडी ॥ गवई धाडी ॥
किर्त करून दावी ती रिझविती आणुन रसगोडी ॥ आखर उजाडी॥
जन्माचे सार्थक उभयता पांडुरंग जोडी ॥ वारी आषाढी ॥
पाय उतारा येईन मागे पळभर ना सोडी ॥ मनाच्या ओढी ॥
जिवंत तोपर्यंत ईश्वरभजनीं मन भरते ॥ भरून उरते ॥ २ ॥

अहोरात्र अहो दिवस वेद करिती स्नानसंध्या ॥ जगद्वंद्या ॥
आवरजुन पंचप्राण ईश्वरभजनीं भरल्या नद्या ॥ गाळीव चांद्या ॥
साधन करून पाय जोडिले शरिराच्या गाद्या ॥ हाताच्या गिरद्या
मजवाणी कोणी दुःख भोगिले सुख भोगिती वाद्या ॥ रांडा सोद्या॥
बाराच्या राशीचे सोने लोपेना मुद्रा ॥ पारखी भेद्या ॥

पुतळी आपला गुण टाकिना काय बोलु वाद्या ॥ जिवाच्या चिंध्या
झाले तर राव कसे सोडिले धन पुरले उकरिते ॥ धावले पुरते॥३
स्त्रीपुरुषाची जितकि लक्षणे माहित सकुमार ॥ वृत्तांत सारा ॥
खेळ खेळुनि वेगळे खर्च करिता पुतळ्या मोहरा ॥ लालाच्या धारा॥
आपण होउन कोणी म्हणती चाल बागांत राजकुमारा॥बझरी फेरा
जेव्हां बलावूं जाइल तेव्हा येती व्यभिचार ॥ कलिचा पहारा ॥
चंद्रवदन माहियार फारसी वाचून पहा यारा ॥ भेद सारा ॥
प्रित ऐकता दुभग काळिज जिव प्याला वारा ॥ नको सौसारा ॥
सगन भाऊ म्हणे राज अंबिरा शोधुन पहा घरेत॥ सागरि भरते॥

———

# चंद्राचे चांदणे सितळ कां उष्ण

## ( राग गारा )

चालः—नाजूक रुपडे मुखोटा नवतीची लाली

होनाजी

चंद्राचे चांदणे सितळ कां ऊष्ण प्राणपती ॥ तें सांगा मजप्रती कल्पना डोळ्यामधिं खुपती ॥ धृ० ॥

चांद रात्रीचा चंद्र पौर्णिमेचा चंद्र गोड ॥ आवड मनाची सांग साजणी नको पडूं देउ कोड ॥ अत्तर अर्गजा केशर कस्तुरी आण लाड लाड ॥ खुल्या चांदण्यामधिं लावा उदबत्त्याचे झाड ॥निवांत निश्चयपणें राजसे ऐकून घे कोड ॥ शशी तेज पाहाता उभयता मग होइल फोड ॥ चाल ॥ पाहुन तेज कांती चला मंदिरांत जाऊं ॥ करंगळ्या धरून आदरें बाहेर परतोनी येऊ ॥ खुण मिळल्यावरी अपुली मुख भरूनि विडे घेऊं ॥ शशी तेज उष्ण कां समजुत पडली गुण शांती ॥ १ ॥

आपण सितळ असल्यास प्रभा चंद्राची शीतळ दिसती ॥ आपण उभयता उष्ण कल्पना मनिं वसती ॥ पर चंचळ बावरी सख्याला अति आदरें पुसती ॥ ती तांत्रिक लक्षणें प्रितीची चतुरा परि वस्ती ॥ राव बाजीचे शहर नमुना पुणे ग्राम वस्ती ॥ अहोरात्र अहो दिवस होती इष्काची कुस्ती ॥ चाल ॥ आर्ज विनंती पहिली मी उभी कर जोडून ॥ गुण ग्राहिक गुण पाहातां आले ब्रह्मपुरीं सोडून ॥ राव सवाई समशेर ठेविले चित्तीं ताडून ॥ लाजून बसते भिडून जडूं दे लालडीला मोती ॥ २ ॥

समजूत माझी झाली शुभ्र पोषाग करी जरिचा ॥ सिरपेंच तुरा कंठी चौकडा झोंक भिकबाळिचा ॥ हिरव्या पाचुची सैली पदक तळीं लोलक निळीची ॥ रत्नजडित करी कंकण झगमगतो जडावाचा ॥ दृष्टी भरून पाहाते छबिला शहर बडोद्याचा ॥ चटकचांदणी बनले मला घ्या शालु पैठणीचा ॥ चाल ॥ चमकली जसी

बीजली अति गर्जना करूनी ॥ तुमचे स्वरूप आगळे उगवला सहस्त्र तरणी ॥ पेहेराव करिन आगळा निर्मळ वस्त्राभरणी ॥ लंपट स्वरूपावरून पाखरावाणी फिरेन भौंती ॥ ३ ॥

चंद्र मध्यासी आला आतां एक विनंती माझी ॥ ख्याली-खुशालीमधि सख्या खेळुं चौसर बाजी ॥ डाव सख्याचा आला सखीवर जोबन केला जी ॥ नग्न गंगा स्नान कराया न व्हावें वाजी ॥ जशी मोहनानें बटावासंगे केली इष्कबाजी ॥ बोभाटा दक्षिणेंत कळला जन म्हणती वाहवा जी पचाळ ॥ ज्योतिशी ज्योत मिळाली क्षणभर वसते जवळी ॥ तुम्ही फुल गुलाबाचे मी शेवंती पिवळी ॥ रमता सुख संतोषेहि तनु नूतन कवळी ॥ सांभाळ करा माझा सुंदर वचनाला गोती ॥ सगन भाउच्या कवनावरती फंदी लोक झुरती ॥ ४ ॥

# कबूली जबाब

( राग सिंदुर्या )

चालः—साजणी आम्हासी फार लावीली माया० ॥

होनाजी

राजसा देउनि भरवसा कोण्या गोष्टीचा राग धरिला ॥ धृ० ॥ सावळी कांती पिवळी सुरत कवळी कोणास दाऊं ॥ भागले रात्रीं जागले तुम्हाला कोठें धुंडित जाऊं ॥ चुरमरून पदर सावरून झोंप पलंगीं एकली घेऊं ॥ चाल ॥ शृंगार करून उभी द्वारीं ॥ चोरून जाता परभारी ॥ रोहोकुनि या वाटा च्यारी ॥ भागले रात्रि जागले तुम्ही तर पण सिद्धीस नेला ॥ १ ॥

भरजरी बुट सोनेरी लाल पातळ पैठणी लेत्यें ॥ चकचकाट आरसेमहाल बिच्छाना सुभक करून ठेवित्ये ॥ हौसेनें धरिन पदरास सख्याचे पुढें उभी राहते ॥ चाल ॥ कोठवर छळूनिया पाहाता ॥ परकीच्या घरीं कसें जाता ॥ नित नवा रंग उडविता ॥ आर्जवांत मर्जी धरा पांखरा लालडीच्या लाला ॥ २ ॥

जोडली प्रित तोडिता कोणाचा आसरा मज नाहीं ॥ चालवा लळा अहो मि पडले आज संशय नाहीं ॥ तुम्ही श्रीमंत आम्ही गरजवंत पाहाता पलंगी आज येई ॥ चाल ॥ कां करिता पातळ माया ॥ लावण्य स्वरूप मी जाया ॥ या पलंगी बसा गुणिराया ॥ आधी विडा करुनीया देत्यें तुम्हाला मुख भरून बोला ॥ . ॥

ऋतु वसंत आमुचे दिवस सख्या आज करूं इष्कबाजी ॥ लावण्य गळा कोकिळा तुम्हाला आहे मी आज राजी ॥ भोगावें बसुन प्रितीनें ये ग खेळूं चौसर बाजी ॥ चाल ॥ खुपरंग करून वेवहारी ॥ मी दासी पदरची प्यारी समजला तिचा कंसारी ॥ गुणिराज रामजी गाती सख्ये आठवित जा सजनाला ॥ ४ ॥

---

# माझ्या हरा

## ( राग सिंदुर्या )

चालः--तुम्ही सजन सुजाण घ्या आदराचे पान--

होनाजी

ग्राहि चला जरा मज कमलाणिच्या हरा ॥ मज गरिबासी तारा अथवा मारा ॥ धृ० ॥ खुरवान तुला प्राण हवाला केला ॥ या पलंगीं बसा धावुन धरिते शेला ॥ सिकविले तुला हा पण सिद्धीस नेला ॥ राजेंद्र धनी शब्द सुखाचा बोला ॥ स्वप्नांत मला मदनबाण चेतला ॥ दचकुन उठले द्वारीं आले पाह्याला ॥ तुज वाचुन मजला नाहीं कोणाचा थारा ॥ १ ॥

लावुनि माया भोगा कवळी काया ॥ कोण्या गोष्टीचा आंतर पडले पाया ॥ चंचल चर्या आज दिसली गुणिराया ॥ मि कुळिवंताची काया तुमची जाया ॥ मुखडा पाह्या उभी राहते धाउनि या ॥ आज कृपा करा चला महालीं लवलाह्या ॥ नको देउ दगा आज दिसला चित्त चोरा ॥ २ ॥

मुठ भ्रमाची बाही फोडित लाखाची ॥ मी जोड केली सजनाच्या पायाची ॥ लइ मर्जीची कोण सवत मायेची ॥ तिचे वेड लागले आण माझ्या रक्ताची ॥ या चित्ताचि सोड कल्पना मनिची ॥ आज कृपा करा आण राधासखयाची ॥ सिरदान तुला आज चरा मोत्याचा चारा ॥ ३ ॥

रंगित माहालीं झटपट मैना गेली ॥ तीन सजन भोगिला अशा प्रितीच्या चाली ॥ लइ मर्जि मिळाली विषयलंपट झाली ॥ अशी प्रीत चालवा आण रक्ताची घाली ॥ ऐकुन चाली जोतिसी जोत मिळाली ॥ गूणी सगन भाउच्या चरणाला मिठि घाली ॥ नित्य गाई राशा जसा पट्ट्याचा मोहरा ॥ ४ ॥

---

# कस्तुरीचा सुगंध

## ( राग संकीर्ण )

चाल:–सूर्यवंशी राजा दशरथ परम पवित्र–

होनाजी

कस्तुरी वाळवित होते माडीवरती ॥ बेदरची कामसेना चतुर गुणवंती ॥धृ॥ बेदर शहर आंदे ठिकाणा ॥ पात्रा नांदे कामसेना ॥ चतुर गुणवंत देखिली वदना ॥ घरि अमिर द्रव्य खजिना चढती नवती ॥ साहाराग छत्ती सरागिण्या जाणत होती ॥ चाल ॥ साहा राग छत्तिस रागिण्या जाणत होती ॥ कंठांत जसी कोयाळ बोलुन पुरती ॥ ति एके दिवसी बसली माडीवरती ॥ अंमल अडचा प्रहाराचा दुपार कलथी ॥ कस्तुरी वाळवित होती आपले हाती ॥ मध्यम सुटला वायु त्याच वक्ती ॥ त्या कस्तुरीचा श्वास वायु संगती ॥ दौलताबादेस गेला राव वाच्छायप्रती ॥ आज कस्तुरी कोणापसी श्वास मारिती ॥ याउपर दिवाण बोले वाच्छाया प्रती ॥ १ ॥

दिवाण म्हणे वाच्छाया अवधारी ॥ बेदरी वाळत असे कस्तुरी कामसेनाचे माडीवरी ॥ कि पवने श्वास आला येथवरी ॥ की सत्य जाणा ॥ बाच्छाय म्हणे सांभाळून बोला वचना ॥ चाल ॥ वाच्छाय म्हणे सांभाळून बोला वचना ॥ हे लटके झाले तरी सिर माराना ॥ ति वेळ लिहिली त्याच दिनमाना ॥ मग जासुदाची जोडी केली रवाना ॥ ति गेली बेदरी जिथे कामसेना ॥ ऐकतां पुसु लागली धुंडती कवणा ॥ जासुद म्हणे बाच्छाय धाडिले आपणा ॥ पत्र दिधले तिजपासी वाची कामिना ॥ विचित्र हास्य कस्तुरी नांव निघताना ॥ वाळविली कोणे दिवसी वेळ सांगाना ॥ लिहुन पाठवा ठिक या अर्थी ॥ मग बाहिरी निजामशाहा गणिका पुसती ॥ २ ॥

अमुक दिवस अमुक वेळ ॥ पत्र लिहीती गणिकाचे वेल्हाळ ॥

लाखोटे दिले करून त्या वेळ ॥ दिधले जासुदाजवळ ॥ कि जोडी फिरली दौलताबादेस ताबडतोब गेली ॥ चाल ॥ दौलताबादेस ताबडतोब गेली ॥ बाच्छाई कचेरी होती तेव्हां भरली ॥ खुर्निसा करून जासुदें पत्र अर्पिली ॥ साबाजि अनंताने हुजर वाचिली ॥ तो दिनमान ति वेळ ठीक निघाली ॥ ऐकुन हासे बाच्छाय शावा-सकी दिधली ॥ आज पत्र तुझी चतुराई आम्हास कळली ॥ ही वार्ता दुनयामधें प्रगट झाली ॥ साबाजी रणाळे कर चातुरवल्ली ॥ वेदरी निजामशाहिची जोडी बनली ॥ ति इकडे कामशेना मनांत झुरती ॥ साबाजी अनंताला पाहुन म्हणती ॥ ३ ॥

गणिका तेव्हां कामसेनानें ॥ सर्व शृंगार काढिला तिनें । बिंदि, सिसफूल गळयामधें रत्नें ॥ नथनी बुलाख सुढाळ वदने ॥ गळयांत चिंचपेट्या मनगट्या मणि ॥ कुसुंबी जरी पिसवाजरेल चरित कंठी ॥ चाल ॥ कुसुंबी जरी पिसवअवेळ जरित कंठी ॥ रुणझुण पायिं पोल्हारे जोडवे बोटी ॥ वरकड डागिन्याची घेतली पेटी ॥ बत्तिस अभरणें अवचळ द्रव्य गांठी ॥ गाडींत बसुन चालली बाच्छाय भेटी ॥ स्वर्गीहुन आली रंभा सुखाचे साठी ॥ हि उपमा साजे तिला चतुर मोठी ॥ पोहोचली दौलताबादेस हर्ष चित्तीं ॥ चांभार टेकडीजवळ घेतली वस्ती ॥ ४ ॥

गायन करी कामशेना पुरती ॥ जंगली हरणें तेथें होती ॥ आलाफ केला त्याच ठायाप्रती ॥ गवरी रागिणी झालि बोलती ॥ तो आळविला तिनें ॥ त्या नारिजवळीं आलीं जंगली हरणे ॥ चाल ॥ त्या नारिजवळी आली जंगली हरणे ॥ बैसला तिचे सन्मुख रागज्ञानानें ॥ हार गळयांतिल काढिला त्या गणीकेनें ॥ हरणाच्या गळा घातला आप हस्तानें ॥ मग बाच्छाया फिर्याद केली त्या नारीनें ॥ तुमच्या नगरामधें मला झालि आटवण रात्रीं । गळयांतुन हार नेला चोरून ॥ हा ठिकाणि लावावा मेहरबान ॥ ऐकुन बाच्छाय म्हणे दिवाणाप्रती ॥ हार इचा इजला द्यावा ऐसे म्हणती ॥ ५ ॥

हुकूम बाच्छाय ऐक असा जाहला ॥ साबाजि अनंत तेथून निघाला ॥ संगें घेऊन कामसेनेला ॥ तेव्हां तो तिसी पुसूं लागला ॥ कोणे ठिकाणीं घेऊन गेला चोर त्या रानीं ॥ मग दोघे चालली तेव्हां हस्त धरूनी ॥ चाल ॥ मग दोघे चालली तेव्हां हस्त धरूनी ॥ हार गेला तेथें बसली दोघे जा नी ॥ मग काय केले साबाजि अनंतानी ॥ तो सर्व गुणसंपन्न पूर्ण चतुर ज्ञानी ॥ आळवी राग तेव्हां त्याच मैदानी ॥ हा सर्व मेळ हरिणाचा ऐकुन कानीं ॥ त्या दोघांजवळ आले प्रिती करूनी ॥ त्यामधि नाहीं आला हाराचा धनी ॥ मागुन आला तयाचे पंक्ती ॥ तो आणिला कचेरिस बाच्छाय तेव्हां पाहती ॥ ६ ॥

फिरयाद झाली त्याच दिनमाने ॥ हार आणविला तिसऱ्या दिनीं ॥ बाच्छाय खुशी त्यास पाहुनी ॥ धन्य एकाहून एक ज्ञानी ॥ झाली गणिकेसि मेहरबानी ॥ मोहोरा दिधल्या तबकभर ॥ ति म्हणाति भोग मजला उभी समोर ॥ चाल ॥ ति म्हणाति भोग मजला उभी समोर ॥ माझा हेत आहे साबाजि अनंतावर ॥ एक रात्र द्यावी मजला घटका चार ॥ हें बरें म्हणुन बाच्छाये दिल्हें उत्तर ॥ सांगितले साबाजिला तिचें उजूर ॥ मग साबाजी अनंत गणिका ती नार ॥ अहो कळेल ते तेव्हां माडीवरती ॥ पंजातिल मदन त्या दिवशीं तिच्या हातीं ॥ ७ ॥

माडीला शिडी होती लाविली ॥ प्रथम पायरी काढिली पाहिली चढता येईना ऐशी केली ॥ चढू जातां पायरी शेवटली ॥ नाही असे पाहुनी तेथें खुंटली ॥ साबाजीस म्हणे हस्त द्या मज कारण ॥ साबाजि अनंत उठला तेथून ॥ चाल ॥ साबाजी अनंत उठला तेथून ॥ पंजा धरतांना तीचा उतरला मदन ॥ संपूर्ण जाहली भोग भोगिल्याविण ॥ हरला कामसेनेचा गर्व पुर्ण ॥ गुरु गोविंद-राव वस्ती वाई ठिकाण ॥ हा नाथ सांप्रदा स्वतः जाचे दर्शन ॥ द्वादश पंथाचे आदेश नाथ नमनी ॥ सिद्धनाथ कविची कविता नाथपंथी ॥ ८ ॥

———

# निवाडा

## ( राग कालंगडा )

चालः–राजमंदिरी आपण उभयता बसतो–

होनाजी

सवति सवतिचा कजिया लाउनी तुम्ही देता स्वामीराया ॥ लाउनी पदर मुखीं आडवा हसता नाहीं तुम्हां तिळभर माया ॥ धृ० ॥ मी वचनाची खरी राजसा साक्ष तुझ्या चरणाजवळी ॥ उत्तरासि प्रतिउत्तर दिधले नाहीं तुम्हा कवणे काळी ॥ सखीला तुम्ही जवळ घेता मला ठेविता दुर महालीं ॥ रोज उठोन पाहाते नित्य बसविली तुम्ही तिजवर पाळी ॥ चाल ॥ काय आवड आहे जिवलगा तुम्हाला तिची जी जी जी ॥ मी गोरी गोमटी आवड तुम्हा सवतिची जी जी जी ॥ मग मागुन केली तिच जाहली प्रितीची जी जी जी ॥ लाऊन कडी द्वाराची रावजी बसता गंजिफा खेळाया ॥ १ ॥

दुसरी म्हणे एक राजसा गोष्ट सांगतें तुजपाशी ॥ वडिल जाहले म्हणुन काय तिनदां टाकुन बोले सवत मसी ॥ हि म्हणती मी फार चांगली इचे गोरेपण इजपासी ॥ मी अमंगळ जर असेल चांगुलपण दावित नाहीं ही कोणासी ॥ चाल ॥ हि मलाच म्हणते स्वामी माझा फितविला जी जी जी ॥ सवतिनें साधला वैर सुतनी सुतविला जी जी जी ॥ काय करूनि चेटक करणी मथविला जी जी जी ॥ बग गुती गुतविला लाविले मला मंदिरी झुरवाया ॥ २ ॥

साजव म्हणे एक सुंदरी दोघिसारख्या तुम्हि मजला ॥ तुला उणे काय केले साजणी गडे अन्नपाण्याला ॥ वस्ता थारा एक सारख्या देतो तुम्हाला घालायला ॥ उंच मोलाची वस्त्र सारखी देतो तुम्हा नेसायला ॥ चाल ॥ कोण्या गोष्टीची कमी नाही आज-

वर जी जी ज़ी ।। जे मागशील ते देईन भरला अंवर जी जी जी ।। तुम्ही आपल्यामधीं का करिता किरकिर जी जी जी ।। किरकिर करिता रोज येता कपाळ माझे उठवाया ॥ ३ ॥

सगनभाऊ म्हणे निवडिला न्याय दोघीचा हा जाणा ॥ एक मेकिची चाडाडी सांगातिल आपण अ.णू नये मना ॥ ४ ॥

---

# चांदण्यातील विरह

## ( राग भूपाळी )

चालः—आज का गे कांग बोलतो घरावरी

होनाजी.

पडले शुभ्र चांदणें काय मी करूं ॥ अशा चांदण्यामधें नाही पाखरूं ॥ धृ ॥ स्वच्छ आज प्राणसखे केले स्नानगे ॥ शुद्ध सेज केली लाउन पंचप्राण गे ॥ सद्धटाव पाहुन हरली भूकताहान गे ॥ खुल्या चांदण्यामधें एकली फिरूं ॥ १ ॥

शशीप्रती प्रार्थना करिते बरे ॥ तेज तुझे पाहुन माझा प्राण घाबरे ॥ दया करिल प्राणसखा भेटवाल त्वरे ॥ गच्चीवरून उडी टाकीन कशास्तव ठरू ॥ २ ॥

वाट पाहु पाहु नेत्र श्रमले आता ॥ मायबहिणी जवळ नाही आणिक हा पिता ॥ दुःख कोणा सांगू आतां जन्म कीं वृथा ॥ गिरीकंदरीं भटकत फिरू ॥ ३ ॥

दिडप्रहर रात्र झाली तेरावी घडी ॥ सखा उठून पाहती द्वारि छबेला गडी ॥ उपचारें घेऊन गेले मंचकावरी ॥ छंद नव्हे फंद सगनभाऊला स्मरून ॥ ४ ॥

— ——

# मुषाफर

( राग जगंता )

चालः—आम्ही मुशाफर गडी राहु इच्छितो

होनाजी

आम्हि मुशाफर लोक प्रित करू पाहातो साजणी। दिपकळीचा रंग पाहुनी पतंग झुरतो मनीं ॥ धृ ॥ का प्रवासी आम्ही जाहलो सांगतो आहोत घरच सुखी ॥ घोर जिवाला लाउन गेली परम जियाची सखी। जिवंत अथवा मृत्यु पावली आम्हास केले दुःखी ॥ कारण काय तुम्हा सांगावे जाहला असा घातकी ॥ चळण वळण पाहण्यांत बरी दिसतिस रत्नपारखी ॥ प्रितपरीक्षा करून का हाडसी दुसरी जागा चुकी ॥ चाल ॥ या कर्मानें जर जर साजणी ॥ नाही येत पुण्याची सर गे साजणी ॥ पाहिले गडे गंगा तीर साजणी ॥ पाथ उतारा आलो शरीर घेऊन उभा आंगणीं ॥ लोटुन देऊ नको फिरून आम्ही जाऊ कोणत्या वनीं ॥ १ ॥

आहे मुशाफर बरें बोलता कर ठेवुनिया कटी ॥ कासावीस झाल्याविण कोण करी शितळ अशा संकटी ॥ या कर्मानें निसुर बैसले घरामधें एकटी ॥ प्रीतीच्या मंत्राची नाही दिधली मातेनें घुटी ॥ काळेसावळे स्वरूप माझे राख घेऊन भर मुठी। नित्यकाळी आंगास लाविते काय होईल शेवटी ॥ चाल ॥ होईल ते होऊ कसें साजणा ॥ नाही करीत कोणाची आस साजणा ॥ औषधास वेडा ऊस साजणा ॥ गोड निघे ना रस कडूपण काढिले वीरळा सूती ॥ ही गोष्ट मोठी कठिण पाहा घर दुसरी जागा निश्चिती ॥ २ ॥

उत्तरास प्रतिउत्तर दिधले मनि आमच्या मानिले ॥ चित्तातिल वर्म कर्म आवघे प्रत्यक्ष जाणिले ॥ गोड कडू निवडिता कशानें स्नेहउदकिं नाहले ॥ एक दुःख उभयता असावें कल्प दोष छाणले ॥ गावीच्या मजा गावी राहिल्या त्यांतुन गुण आणिले ॥

पहिल्या पासुन केले निवेदन इष्कानें तान्हले ॥ चाल ॥ तूं बहुत योग्य चांगली साजणी ॥ तुझ्यापासी वृत्ति रंगली साजणी ॥ विसरावि गोष्ट मागली साजणी ॥ या जर वेडा डागिली जिव्हे देही माता वहुगुणी ॥ जीवंत तोपर्यंत नाही जाणार तुला टाकुनी ॥३॥

धन्य चतुर सामर्थ्यवान सन्मान करिते अता ॥ एक वचन राहिले वसा सेजारी राव पेकता ॥ पार्थविराच्या रथी सारथी श्रीपती रणांत स्वता ॥ कौरवासहित नागिवली जगीं मान मान्यता ॥ कृपा करून भगवान जाने मुखपाठ शिकविली गिता ॥ मग कां अर्जुन पुन्हा चालिला अभिमन्युकरता ॥ ॥ चाल ॥ अक्षर धरावे चित्तीं साजणा ॥ या कलियुगाच्या प्रीति साजणा ॥ मागिली कीर्ति आठविती साजणा ॥ धरून मुशाफर हाति सखे दे इष्काची सरवती ॥ सगनभाऊ म्हणे विघ्न निवारी रुक्मिणीचा पती ॥ तुम्ही मुशाफर लोक प्रीत करू पाहता कोणत्या रिती ॥ प्रीतीचा आवभाव काय तो सांगावा मजप्रती ॥ ४ ॥

———

# पिवळी सुंदरा

## ( राग पयज )

चाल:-हिरवी प्राणसखे बनलिस अरवा

होनाजी

मी पिवळी पाकळी पिवळा प्राणसखा चाफ्याची कळी ॥ ध्रु०॥ पिवळे तेज कसे पिवळी कांती ॥ प्रियकर माझा पती ॥ पिवळे डागिने छत्र विलायती ॥ पिवळेच कंकण हातीं ॥ पिवळे सूर्य तुम्ही मी प्रभा किती ॥ रायाच्या संगती ॥ पिवळी बनुन आले स्वामीजवळी ॥ १ ॥

उतरून माडीवरून बसते मोहोर ॥ नेत्राच्या समोर ॥ उभय-ताच्या मनीं हिरवें वस्त्र ॥ हिरवेच जंगल सारे ॥ बाग बघाया उठा हात खांद्यावर ॥ नाही कोणाचा पदर ॥ तुम्ही तारक माझे राजेंद्र कुळी ॥ २ ॥

मला पिवळे पातळ बारीक गवती ॥ पदरावर शेवंती ॥ पिवळी काचोळी जडली मोती ॥ गोट किनाऱ्या भोंवती ॥ पिवळी पूतळी बनुन फिरते भोंती ॥ रायाच्या संगती ॥ बसा असे वाटते आज्ञा पाळी ॥ ३ ॥

स्वामी पायाचे सुख भोगिते ॥ आनंदवृत्तीनें राहाते ॥ सख्या-च्या झोकावर झूमकत येते ॥ नोकेवर चालते ॥ शरिरामधें माझ्या गोड वाटते ॥ रोम रोम खुशी होते ॥ सगनभाऊ म्हणे आज्ञा पाळी ॥ जशी राधा गोकुळी ॥ ४ ॥

———

# शकुनवंतीची याचना

( राग–रामकली )

चाल--हें नेत्र रमणे सखे गूणनिके रात्रौ चौथे घडी

—होनाजी.

तूं रत्न माझे गूणी सद्गुणी बाळपणीचा गडी ॥ इष्कबाज जहराची पूडी ॥ धृ० ॥ रत्नागर सागरा आगरा मम कंठीचा मणी ॥ आहे पण जाणेल तो तन्मणी ॥ प्रित परीक्षा करून बोलते सत्गतीत होउनी ॥ बसावें स्वस्थ सिंहासनीं ॥ पंचाक्षरी सारखे बरोबर सांगावे साजणी ॥ घडल असले पूर्वीचे ऋणी ॥ चाल ॥ तुम्हीं सुखसागर मी स्मरते इंद्रायणी ॥ तुम्ही लाल गौर मी तुमची मृगलोचनी ॥ तुम्हि बाच्छाय मी आलबी चंद्र वदनी ॥ तुम्हि चंद्र मी चांदणी उभयताहि सोन्याची घडी ॥ सुफळ जाउं द्या उजवी गूढी ॥ १ ॥

आरक्त नेत्र नका करूं मी तुमची शकुनवंती ॥ प्रित आक्षरे धरावीं चित्तीं ॥ प्रधानकन्या पुत्र सावकाराचा लक्ष्मीपती ॥ नगर पुण्यशहर चंपावती ॥ शिरच्छेद करावा हुकूम राजाचा निश्चीती ॥ वजिरकन्येसी दुति सांगती ॥ चाल ॥ पुरुषाचा वेष जाले स्वार तुरुंगावर ॥ त्या रणांगणी घुसली जाउन सुंदर ॥ पी पाणी सख्या पाहुन घे डोळेभर ॥ राजा म्हणे प्रधानपुरुष कीं स्त्री सांग आवडी ॥ खोंचला प्रधान मनिं चरफडी ॥ २ ॥

तिसरी विनंती कसी महाराजा सांगे सख्याला सखे ॥ प्रित लेले मजनुसारखे ॥ धर्माची प्रित नव्हे पाक मोहबत सच्चा सारखी उभयता अपले घरचें सुखी ॥ नित्य काळ बागामधें जावें त्रयोदश विडे मुखीं ॥ मुखोवटा सूर्यबिंब लखलखी ॥ चाल ॥ तक्ता गुलाल खूष रंग पाहुन ठरियेले ॥ कौतुक पहायासी नगरलोक भरिलेले ॥ थाट करून लैलेस पाचारिले ॥ वृत्तोला मोहिलें दुजेपण काय स्याजमधे गोडी ॥ किर्त अपकिर्त जगीं केवढी ॥ ३ ॥

चौथी विनंती कसी महाराजा नाहीं तुम्ही ऐकिली ॥ प्रित माझी स्वामिनीं पाहिली ॥ भ्रतारा आधीं भोग देइन म्हुन राजकन्या बोलली ॥ वांज पुत्रास भांक दिधलीत अश्वीनीवर स्वार पतीबरोबर दोघे चालली ॥ टेकडीवर कोपी पाहिली ॥ चाल ॥ कुळदैवत माझे पतिरायासी म्हणत क्षण एक ठरा दर्शन येते घेऊन ॥ पति पाहातो आली सख्याला भोग देउन ॥ सगनभाऊ म्हणे रामा मनाच्या आनंत तरंग बोढी ॥ करा वीठ्ठल पंढरिचा गडी ॥ ४ ॥

# न्हाताना

( राग—सोनी )

चाल—देउनी इमाना कापी माना दुसमाना

होनाजी

उभारूनी बाह्या बला घेते बसुनीया ॥ आ रे माझ्या चोचल्या उभी साळू मुख पाहया ॥ ध्रु० ॥ काल सख्या तुम्हि सायंकाळी ॥ उभे होतां तुम्ही तिसरे ताळी ॥ खेळतसे गंजिफा तुम्हीं वनमाळीं॥ मारुन तुमची काय म्हणती गुणीराया ॥ १ ॥

का करिता असे मला न्हाऊं घाला ॥ निम्मे अंग भिजल्यावरी मासि बोला ॥ गेंद पाहता न्हाता आतां देते झोला ॥ नागावाणी डूला मुका घेत निजला ठाया ॥ २ ॥

न्हाऊं उभयता बरें या सुखशयनीं ॥ चिकटून बसते मोहोर उकलून वेणी ॥ इगडून धारिली ऊर बुंद आले नयनीं॥ मुदी रूपली नार करिती गाया वाया ॥ ३ ॥

न्हातो उभयता बरे भात फोडणीचा ऊन ॥
जेवूं घालते तुम्हा उतरल चहडला सीन ॥
सगनभाऊ म्हणे सिद्धीस न्यावा पण ॥
रामा जाचां तोच जाणे व्यर्थ जन्म वाया ॥ ४ ॥

———

# राव सिदगांव करा

( राग संकिर्ण. )

चाल:—पति पाहू राग रंग या दुनियाचे

—होनाजी

पंचानन बाघिनिचे । पति पाहु तमाशा नाग तुम्ही नागनिचे ॥ ध्रु० ॥ पाची पक्वान्न तयारित पुलावबाजी ॥ केळीच्या फुलाची भाजी ॥ सिद्काव करा गचीवर थंड हवा जी ॥ गरमागरम जेवा जी ॥ जद्दलेवादी पोपाख गुलाबी प्याजी ॥ गुडगी तंग वर कांचा जी ॥ बोलणे आवडते लाहान खरी ठेंगणिचे ॥ १ ॥

राजसा मला द्या शृंगाराची पेटी ॥ आपल्या गळ्यातिल कंठी ॥ तरनारित कोरी शुभ्र खड्याची आंगठी ॥ सख्या घालिन मधल्या बोटीं ॥ पेहरवा करिन मी आपला मोळा मऱ्हाठी ॥ नोकदार दक्षण घाटी ॥ साठ मार तडाखे पिस्तूल संगिनींचे ॥ २ ॥

पुष्पराज माझा ऐकुन घ्यावा दोहोरा ॥ भोगिंद्रा भोग्य भवरा ॥ दिवसान दिवस रंग चढता निरा गहिरा ॥ झडते फेरावर फेरा ॥ तुम्ही नाद लुब्ध कां भेदी इष्क करचारा ॥ समजून घ्या मग विचारा ॥ नित्य ख्याल तमासे अखंड रंगजींचे ॥ ३ ॥

धनि आप सुगर महाराज श्रेष्ट राज्यांत ॥ या कलीमध्यें भगवंत ॥ ना मुराद गरिब आम्ही तुमचे अनाथ ॥ पायधूळ निर्जीव प्रेत ॥ आंगिकार माझा करा घ्या पोटांत ॥ मस्तकी ठेवा हात ॥ गाई सगन भाऊं तेज कांच वंद आंगणींचें ॥ ४ ॥

———

# काय म्हुन घातलीस आण

( राग भूपाळी )

चालः-मऱ्हाठ मोळा तुझा ॥ जपून चाल लोक

होनाजी

नार मऱ्हाठमोळयाची ॥ काय गोड बोलणे भुजवर चालणें मुखत चौडाळयाची ॥ धृ० ॥ उत्तम मास कार्तिक ॥ पाहिलास आरवार गुरुवार शनिवार सात्विक परमार्थिक ॥ जिवा वाटतें सुख ॥ पापणीच्या बाहेर डोळे केले जाहिर छातिंत भरली हुक ॥ घामेजले मस्तक ॥ जहरी इंगळीचा डंक उमरिने दोन्ही पंख जाहले मी भयानक ॥ आग झाली टाळयाची ॥ १ ॥

काय म्हुन घातलीस आण ॥ तुम्हि कोण आम्ही कां बायकोचे स्वामी उभे राहा सावधपण ॥ नाहीं गेले पोरपण ॥ दाढी डोई पिकली देही सारी सुकली जिव्हा चांडाळिण ॥ जगण्यांत सद्गुण ॥ हातीं घ्या दरपण ॥ सांगा निरोपण लोका चित्त देऊन ॥ गोळे बेरिज गोळयाची ॥ २ ॥

गोळे बेरिज आम्हाला ॥ कार्तिक मासीं वद्य एकादशी पुन चाटका लागला ॥ पेस्तर सालीं तुला ॥ तान्हे बाळ कडेवर मोत्याचे लडिवर आला संतोपला ॥ दिघीवर विश्रांतिला ॥ पाहिलीच भोळवट हातीं तांब्या गळवट पाणी दे प्यायाला ॥ खूणगांठ जिव्हाळयाची ॥ ३ ॥

मन माझे मोहिले ॥ पावले ज्ञानराज फत्ते जाहले कामकाज बरें साधन साधिलें ॥ व्यासाने बोधिले तें फळ प्राप्त आप्ताहुन आप्त श्रीफळ मज लाधले ॥ शिवसांभ आराधिले ॥ राहु केतु तीक्ष्ण रविराशिला ग्रहण चंद्राला लागले ॥ प्रित सावता माळयाची ॥ सत्य सगनभाऊ निमीपुन भाग घेऊं आण राधा सावळयाची ॥४॥

———

# येउं द्या माझी कांहिं करुणा

( राग संकिर्ण )

चालः--राघुकारणें झुरे मैना ॥ अरे चल दुष्टा बमाना

—होनाजी

येउं द्या माझी काही करूणा ॥ पाव गिरिजापति भगवाना ॥ ध्रु० ॥ पूर्व पुण्याईचे ताले ॥ म्हणून हे सुख प्राप्त झाले ॥ जन्मांतरी तप आर्चन केले ॥ रत्न वाळूमधें सांपडले ॥ भाग्य या नशिबाचे ताले ॥ पतिला प्राणदान केले ॥ फुटला हा विषयाचा पान्हा ॥ १ ॥

आज गे कां ही पडली मला भ्रांत ॥ सखा नाहीं आला मंदिरांत ॥ भोग्या भवऱ्यासी एकांत । कसी कामिली सारी रात ॥ कोण्या स्त्रियेसी मन शांत ॥ लुब्ध जाहला न कळे अंत । किती गे बाई आवरूं या मना ॥ २ ॥

आमुच्या प्रीतिमधें अंतर ॥ पडले नाहीं आजवर ॥ आपले गुज सांगूं मी कुठवर ॥ साथ मल्हारी गिरिवर ॥ नेमधर्मामधें आंतर ॥ पडले नाहीं आजवर ॥ आग लागो या चांगुलपणा ॥ ३ ॥

रावळ सिंधु कवी समर्थ माझा ॥ प्रसन्न ज्ञानेश्वर महाराजा ॥ नारिचा रंग गुलाबी ताजा ॥ प्रित चाळवीशी मल्हुराजा ॥ भाउ सगनचा आगाजा ॥ धोंडिराजास पूसा मवजा ॥ रामाचे उत्तर द्यावें गूणा ॥ होन्या गवळ्याचा झाला चुना ॥ ४ ॥

— — —

# नार चंचल मनिं घाबरी

राग संकीर्ण

चालः—फार दिवस लागला छंद तुझा सख्या

होनाजी

जाते ग वयानो नार चंचळ मनि घाबरी ॥ पुरुषाचा पोशाक करुनिया झाले रानभरी ॥ धृ ॥

कर जोडून विनविते सख्यानो मला न्हाऊ घाला ॥ चर्चुन मे लागिरी उंच स्वासीक अत्तर तेला ॥ पांच पेच अलबेली आणा कोणी बांधुन पगडीला ॥ आंगि रेखिला जामा रुंद पट्टीचा बुंद शेला ॥ सजवून तुरुंग खासा वर नखऱ्याचा ठेविला ॥ ढाल लाल गेंड्याचि रंगित हाती समशेर भाला ॥ ॥ चाल ॥ खंजीर ते गा कंबरेस कसुन फाकडी ॥ तीर कमान दुसरी हाती फुलाचा छडा ॥ अश्ववर स्वार जाहली थेट कानडी ॥ रंगिली बत्तिसी घवघावित मूखी वीडी ॥ मित्रिणी उभ्या त्या एकाहुन एक चढी ॥ अश्रुपात वाहती हुंदतात घाडिघडी ॥ बोळविसी आवडी कां जणू जाते माहेरी ॥ लोभ असुं द्या आतां मायबहिणी आम्हावरी ॥ १ ॥

घेउन मूशाफर भेष फाकडी अप्रतिम सजली ॥ मर्दानी दागिने आंगवर चमचमाट बिजली ॥ दाढी बोटी आगठ्या डुबवस्तामध्यें गजबजली ॥ थवथवित शिरी केस अत्तर चमेलामधें भीजली ॥ गुप्तरूपी एकांति मागल्या द्वारानें धजली ॥ निरवानिरव करून सखी जाते मजलोमजली ॥ चाल ॥ मनि हेत धरून मार्गानें चालली त्वरें ॥ दरकूच निघाली ती विषयानें त्वेर ॥ मग तृषा लागली व्याकुळ जाहली बरें ॥ करी भरून घेतली झारी प्राण घाबरे ॥ त्या वनामधें वृक्षावर वनचरें ॥ किजबिज करितातीं जातिवंत पाखरें ॥ मृदु उत्तरें बोलतो का परदेश तिरी ॥ राघु साळूंकीला सांगतो इष्कबाज कुमरी ॥ २ ॥

राघू उत्तर करी पद्मिणी ऐका दृष्टांत ॥ प्रितीची लक्षणे जाणती चतुर गुणवंत ॥ प्रधान कन्या पुत्रसावकाराचा बळिवंत ॥ बाळ-

पणीचा मित्र सखा नित्य रमे एकांत ॥ कोणे एके दिवसी उभयतां उदासले चित्त ॥ वर्तमान कळतां राजाला करि प्राणघात ॥ ॥ चाल ॥ तु भ्रतार माझा मैलागिरी चंदन ॥ आले हृदय भरून मुख-चंद्राकडे पाहून ॥ शामकर्ण वारु तुजसाठी सजविन ॥ घेईन सतीचे वाण म्हणे कामिन ॥ त्या रणांगणी पाणी तुम्हास पाजिन ॥ घालून मुखामधे मुख दिल्हे वचन ॥ असा हेत परिपूर्ण असेल तर जा खुशाल नारी ॥ कार्याकारण केलि निवेदन पुढे कथा भारी॥३॥

एक राघवा वत्तिस लक्षणी मी चतुर भार्या ॥ तसाच्र माझा सत्पुरुष तो गुण प्रकाशसूर्या ॥ सर्व संपन्न गुणसंपन्न गुणातित त्याच्या सौंदया ॥ उपमा द्यावया न मिळे पुरुष स्वामि ऐश्वर्या आज्ञा द्यावी मला पाखरा वळखलीस चर्या ॥ निवडून सांगितला चांगला प्रीतीचा पर्या ॥ ॥ चाल ॥ घरि आणिन उच्चलून ललकारी वारूला ॥ एक वेळ देउन दमचाक करून फेरिला ॥ हे कंटक वन दारूण ऐक दाखला ॥ चालावे घोड्या दूर पंथ राहिला ॥ घोकर्णी करित तिर्थ आसल सखा एकला ॥ यास्तव लौकर भेटावे राजवनसीला ॥ मग जीव संतोषला सुखाची रात्र जाइल सारी ॥ रूसरूसुन बोलणें बरें केले हो घरबारी ॥ ४ ॥

सख्याकडिल वर्तमान निर्मळ पंचमीच्या दिवशीं ॥ वृंदावनी चालले कृष्णाजी द्वारकानिवासी ॥ जे वेळीं सय जाहली प्रियकरिण नाहीं त्यापासी ॥ उदासले अंतरी लागला चरका चतुरासी ॥ अकस्मात येऊन पोहोंचली कामिना सुगुण गुणरासी ॥ जवळ नव्हती सुखे लोटल्या रत्नाच्या रासी ॥ चाल ॥ म्हणे उभे असावे चरणावर लोळते ॥ घालुनी गळ्यासी मिठी हो कवटाळिते ॥ मुखचंद्र तुमचा आदरे कुरवाळिते ॥ कल्पना घेऊन सांगा आज्ञा पाळिते ॥ आज रंग सख्या रंग बाहारिने खेळते ॥ मनि इच्छा पुरवुन घ्यावी कसी टळते ॥ राया वोवाळिते मागली कथा प्राण-प्यारी ॥ सगनभाऊ म्हणे रत्नपारखी ऐकतील सारी ॥ ५ ॥

— —

# राग आणि त्यांचे सांत्वन

## ( राग बिलोवर )

चाल:-कां बारिक कातले सख्या म्हुन किती-

होनाजी

नट नाटक तू खेल छविला अतवाला अलबेली तऱ्हा । गजा आग जाळया भवताल्या फिरतिल बागातुन येता घरा ॥ ध्रु ॥ तुमचि आमची प्रीत रसलि माहित नाहीं तिसऱ्याला । आपण उभयता एक विचारे नानापरि रंग उडविला ॥ कोण आवडती मी नावडती माहित नाही चित्ताला । आपुण कानाडोळा केला कां हो मुलुख कान्हा जाहला ॥ आजवरा म्या चिन्ह पाहिले हारतुरा कोणी पाठविला । माझ्या गळ्याची आण शपथ घे नाव नको चोरू मजला ॥ छेल बटाऊसाठी मोहना राणीचा जाहला मारा । मी रक्ताचे सिंपण करिन मग बसल्या सिग्या फेरा ॥ १ ॥

परस्परे वनभोजन करितां किंचत् सई होईना माझी । जाई जुईच्या वेला खाली नित्य उडविता रंग बाजी ॥ लाहन खुऱ्या ठेंगण्या देखण्या त्या कां होईना त्या राजी । पंचामृत जेवायास मिळते पात्रावर पोळी ताजी ॥ उंच जरीचा शालू नेसून रंगी बेरंगी प्याजी । गळा पडून मुखी विडा घालती चहूंकडून म्हणती वाहवा जी ॥ तुमचे तुम्हा आवडले परंतु डोम जाहला शरिरा । या रांडाला शिक्षा करिन नाहींतर जाइन देशांतरा ॥ २ ॥

परद्वारि मन रमले तुमचे अलावाला गा धाउन घेसी । आडपड्यानें बोलत होते पण आपला सिद्धीस नेसी ॥ तोंडावर बुरखा घेऊन भोजन करतां करतां जासी । प्रहराचा करणा फुंकल्यावर अकरावी भरता येसी ॥ हातापायाच्या डाहाळ्या सोडुन कोमेजुन मजकडे पाहासी । मोठा धुरंधर पंत चालला घाबरून पाणी पीसि ॥ आटके करता नको म्हणता पदरानें घालिन वारा । कोण हत्तिला वढ्याळ म्हणते हें माहित पुणें शहरा ॥ ३ ॥

असो याजहुन नाहीं खोळंबा शपथ आम्ही गंगेची करू। तुझ्या विचारें जें करणें तें स्वस्थ बैस नको रागे भरू॥ तु रूप सुंदर कोमल कांती नयन तुझे कमचे मारू। तुझी प्रीत चालु दे सखी फार पाहिले फिराफरू॥ द्रव्य खर्चुन मूळ पाह्याचे कोण कसे हें दिसती हेरू। कोण दिसेना प्राण प्रियकरे चल रंग-महालीं रमज करू॥ सगनभाउ म्हणे इष्कबाजहो या प्रीतिला जीविधरा। संतांची पायधूळ होउन जन्माचे सार्थक करा ॥ ४ ॥

------

# मय तो जोगिन होउंगी

( राग भुपाळी )

चाल:-वर कांतीचे शब्द ऐकुनी या कानी-

हानाजी

दाद कोइ नही देता मय तो जोगिन होउंगी ।
राख लावा माझे आंगीं ॥ धृ ॥
हाल हाल फकीरी लेऊं, धुंडत बन बन मे जाऊं ।
सख्याला दृष्टीनें पाहू ॥
पितम प्यारे होगये न्यारे विडा किसें देऊं ।
कोणत्या समजुतीनें समजाऊ ॥
हाल जंजिरा लेऊं बंद चोली कुवत्ती देऊं ।
आग्न क्षा शरिरीं लाऊ ॥
रैन चैन दिलख न त्र है मैं ले उस भोगी ॥ १ ॥
चार घडी दम पकडो शहरमे भेजो हलकारे ।
नगर धुंडून पहावे सारे ॥
बखत् पडा है मुजपर रफिक् लाना आजपुरे ।
नाहीं धिर विषयाचे वारे ॥
तिर कलिजा पार बलम मके जर बके मारे ।
असे द्रष्टा केले कारे ॥
छतीय भर भर आई आब मै बैठी बेतागी ॥ २ ॥
ये बन डेसिर ताज लाज रखना मोतीवाले ।
अतां मी त्राहि फार झाले ॥
आई मे हलके बाहेर कपडे उतारके डाले ।
चुडे फोडून तुकडे केले ॥
दोनो हातमे उंचे चिनीके भरभरके प्याले ।
असें द्रष्टा कारे केले ॥
सगनभाउचे ख्याल हरफ चमके समशेर नंगी ।
राख लावा माझे अंगी ॥ ३ ॥

-------

# जळया लागला काय हो वहेनी

## राग संकीर्ण

चालः—आला वसंत शिमगा सण ॥ रंग खेळु सख्या होनाजी

जळया लागला कायहो वहेनी ॥ तीन भाग गेला भावोजी पाहता नयनी ॥ ध्रु ॥ पहिले वहिनीचे नाते ॥ हे बाळपणीच होते साजणी ॥ माहरचे माणूस येते ॥ बोलते भित भीत साजणी ॥ तोंडाउन फिरवी हात ॥ इष्काचा चेतला पोत साजणी ॥

चाल कंबर सोडा लावा घोडा वाडा आहे शेजारी ॥
आपले पतीची सेवा चाकरी करून येते माघारी जी ॥

स्नानासि उन उन पाणी भोजनासी पात्र भरूनि पाठविते ॥ १ ॥ पतिरायाचे चोरीन ॥ मी बंदोबस्ती करीन अहो सजणा ॥ लागली असेल भूक·ताहन ॥ मी आप हस्ते वाढीन अहो सजणा ॥ मजवरती पंचप्राणा ॥ आता करा भोजन अहो सजणा ॥

चाल जेउन बोला रत्न अमोला मजला काय काय आणले ॥
गुजराथीचे अचूक लेणे डागिनें चांगले जी ॥

पांघराया चुनडी बडणी नेसाया रंगी फुटाणी घे साळू ॥ २ ॥ बिंदि टीका सीसफूल ॥ वाळ्या वुगड्या काप अनी ॥ मोल साजणी ॥ मंगळासूत्रा मधील लाल ॥ चंद्रहार सखे तीन मोल साजणी ॥ मोत्याचे पेंडे पाहाल ॥ सरीवरती मीन्याचे वेल साजणी ॥

चालः – छंदफंद डागिणे बुंद आज गेंदपरी घालावे ॥
रूळ साखळया घालुन हळू हळू चार कदम चालवे जी ॥

बोला तोंड भरूनी कमरबस्ता सोडुनी मी येतो ॥ ३ ॥ आता बनलिस रंग बाहारीची ॥ हिरकणी केली गारिची साजणी ॥ मला सांग खबर माहेरीची ॥ बातमी शहर पुण्याची साजणी ॥

पुरवावी हाऊस नारीची ॥ तुम्ही आपल्या प्राणप्यारीची साजणी ॥ चाल ॥ रत्न भूपती झाली भ्रांति धावा करिते क्षण ॥ चंद्राकडे पाहा सूर्याकडे पाहा काय तरि तेज तीक्ष्ण जी ॥ गाई सगनभाऊ रंगेला सुलतानी असमानी जन ह्मणती ॥ जळया भागला कायहो व्हेनी ॥ ४ ॥

— —o— —

# उचलुन कडेवर कां घ्याना

( राग लीलांबरी )

चालः-नुतन वय माझे शरीराला काय करू

छ्केनाजी

लाड लाड येतें येतें मनरंजना। उचलुन कडेवर कां घ्याना ॥धृ॥

दासी मी तुमची तुमची निरंतर। येउन बसते मांडीवर ॥ असुं द्या ममता ममता मजवर। उभी लाजुन सन्मुख पदर ॥ तुम्ही तर माझे माझे सरदार। शरीर नाजुक माझे फार ॥ उष्णता भारी भारी झोंप येईना ॥ १ ॥

चमकत येते येते सरदार। आंगावर लखलखाट जवहार ॥ नेसली शालु उंच पैठणीचा वहार। पदर दीड मजली जरतार ॥ विनंती करिते करिते मी उत्तर। ठेउन मस्तक चरणावर ॥ तोंड गोड बोला सखि सजना ॥ २ ॥

समजल्या आंत्री आंत्री राजबनसी। धरि कवटाळुनि पोटासी॥ नको हो हात लावूं लावूं आंगासी। दिवस तिसरा भी सीवनीशी ॥ उद्या मी न्हाइन न्हाइन चवथे दिवशी। डाग पडला आंगवस्त्रासी ॥ गोळा करूं द्या करूं द्या बिच्छोना ॥ ३ ॥

न्हाउन मी आले पातळ नेसुन। नीऱ्याचा घोळ हातीं धरून ॥ गेला रंग महाली महाली आनंदानं। उभयपक्षीं करी भाषण ॥ हळु हळु म्हणते सांभाळुन। दुखवाल कंबर सरसरून ॥ जवाकडे पाहाता पाहाता हैराण। जणो तुमची निजणे बसणे ॥ सगन म्हणे आतां विडा बसुन घ्याना। उचलुन कडेवर घ्या ना ॥ ४ ॥

— ——

# भेट करवा प्राणतिची

( राग—माझ )

चाल...स्नेहें संगत नदी उतरावी ॥ दासीला दुर न्य० ॥

होनाजी

आ गे सखे घडी वरुषाची ॥ भेट करवा प्राणपतीची ॥
नाहीं आस्ता धन द्रव्याची घालिते आण माझ्या रक्ताची ॥धृ॥
आ ग सखे गेंद गुलाला ॥ कुठे धुंडू छेलछबेला ॥
मी रतले त्या स्वरूपाला ॥ ममतेचा घालुन घाला ॥
आपला पण सिद्धीस नेला। शोभते मी कांता वचनाची ॥१॥
आ ग सखे जडित श्रृंगार ॥ करिते मी वारंवार ॥
मुदराखडी माथ्यावर ॥ कंठानें तु भरपुर ॥
चकचकाट चंद्रकोर ॥ शोभती करी आंगठी पाचुची ॥ २ ॥
आगे सखे लोभ करावा ॥ दिलभर पलंगी असावा ॥
नखरा कोणास दावावा ॥ गोविंदाविडा हातीं घ्यावा ॥
चेतली अग्न या विषयाची ॥ ३ ॥
आ ग सखे कोमल कांती ॥ हातीं धरुन चांदणी राती ॥
ही घडी वरुषाची जाती ॥ भोगावा सखा मंदिरातीं ॥
भाउसगन गुणीजन गाती ॥ रामजी चाल गाई नखऱ्याची ॥
घडी वरुषाची ॥ ४ ॥

# नांव तुझे जयना

( रगा पगज )

चाल--श्याम सखी सुंदरी । कोण्या सुभगाची मदनमंजरी ॥

होनाजी

नयनकुरुंग फिरंग लखाके जस कराडचे मनोरे ॥ कुच तनु रे ॥ ध्रु ॥

नांव तुझे जयना ऐकिली इष्कबाज खेळसणी । आलो बांधोन पैना सोडिले जोतपुर भाळवणी ॥ चंचल मृगनयेना कर कांहीं नैनाची मेळवणी । करते मुकाम हुकुम असेल तर शितळ होय, तनु ॥ कुच तनु ॥ १ ॥

जोतपुरचे लाल पंत्री आलो लालडी हुडकाया । लुटूं दे नगद माल चढूं दे झेंडा लाव भडकाया ॥ आरक्त लोचन लाल भरलो छाती आली तडकाया । ताट भरून डोळयासी हारळ आले खुपती काहाड कणु रे ॥ कुच तनुरे ॥ २ ॥

क्या कहते हो रंगबाज गबरू मै तो इष्क की मारी । ये बंह्मनके राजसाहिब रखो हुरमत हामारी ॥ रखो जरा शिरताज तबसें आखा खुसी तुमारी । रात होने देव बात बनेगी इतनी आर्ज सुनो रे ॥ ३ ॥

सूर्य अस्तमान झालयावर करती रोषनाई । आपले वचन प्रमाण पावली नवखंडची जानाई ॥ चढूं दे इष्क कमान भोगा नाहीं माझी मनाई । रत्न सगन भाऊ किर्ती जयाची नभमंडळीं धनु रे ॥ कुच तनुरे ॥ ४ ॥

———

# त्याचे न माझे सैंवर झाले

## ( राग झिंजोटी )

चाल -सर्व गुणसंपन्न राजेंद्र पाहिला दृष्टी--

**द्दोनाजी**

पति भर ज्वानींत मी भर ज्वानींत वर्षे बारा तेरा। त्याचे न माझें सैंवर झाले लोटले मास बारा ॥ धृ ॥

लग्नाची तारीफ सांगतें पहिलीच केली जुळणी। झाला वृत्तांत ऐकुन घ्यावा रुचीकर केवळ आळणी॥ न्हायाला वसविले परंतु मी नाहीं आले वळणी। डाव्या बाजुला चौरंग त्यावर मौजेची खेळणी॥ डोळा चुकवुन उर चोळावा जशी गव्हाची मळणी। माझ्या बहिणी त्याच्या मेहुणा-हाटकाउन टाका गुळणी॥ रंगाचा भडीमार सख्यावर लाली लाल सारा। रागें कोणाला भरले नाहीं भिजले गुलाल मारा॥ १ ॥

संताप्रति श्रुत केले परंतु राया साळयासी। हृदयीं स्मरता जावे वनांत पर्वणी प्रयाग काशी॥ मानवासी बहुत प्रार्थिले करुणा येई ना त्यासी। न्याय इनसाफ पाखर पक्षामधें प्रित आहे खासी॥ पक्षामधें प्रीत आहे की नाहीं पुसते सांभ निवासी॥ ऐकताच उत्तर पिंगळा कुजबुजला शांती सिवासी। शुभवेळा अमृतवेळा सुवेळ वेळ संहारा॥ सुख जाले शरिरास उभा द्वारीं पतीचा हलकारा॥ २ ॥

काये बोलू सुख वाटे ना हाटका गार पगारा। खरा प्रश्न घ्या ऐकुन जैशा जमिनीवर वर्षती गारा॥ तंत्री मंत्री पुष्कळ भरले पुर्ण अभ्र ढगारा। शब्द तुम्हाकडे नाहीं माझ्या दैवी इंगळ सारा॥ विट्ठलदासी त्याची मी क्षणभर गाईन नाम नगारा॥ ज्ञानेश्वराची ओवी, जनीचा अभंग कोणी तरी गा रे॥ पतीच्या शोकांतरे हाळहळ ते संत हो वारा। लोटांगण घालीन चरणावर होईल विघ्ननिवारा॥ ३ ॥

जासुद विनंती करी निघताना बोले आतां अहाने । दिले जरी पोषाख स्वामीला चक दौलतरायानें ॥ बाग बगीचे पाहाता राव येता आनंदानें । रण बहेरी रणतोफ शिपाई बरोबर सुरमर्दानें ॥ आले राजमंदिरीं स्त्रीयाला नाना रितीचे देणें । जैशी ज्याची इच्छा तैशी पूर्ण करिल भगवान ॥ आयश आराम करा दिन होऊन प्रार्थिते द्वारा । सगनभाऊचे गुण ऐकुनिया गुणीचा होता मारा ॥ ४ ॥

—:—

# नवीन आलिस पहाण्यांत

( राग संकीर्ण )

चाल -निजा तुम्ही वेगळे बिछाना टाकून पलंगावरी ॥

होनाजी

पाहिलेस नेत्रानें जरासे कुच ठेवशील उघडे । इच्छा आमची पूर्वी फिरून आम्ही न येऊं फाकडे ।। ध्रु ।।

नवरत्नामधिं चंद्र पाहिला तेजस्वी आनवा । नवीन आलिस पाहण्यांत शेहेर पुण्यामधिं तुट नवा ॥ आम्ही आपुल्या चित्तांत इच्छीतो ताहे सारिखा जवा । तु आज्ञानामधें तुझी खुण ही ठाऊक तुच्छा जीवा ॥ तुसि करावा इष्क आतां तू दे शकुन उजवा । तोंड भरून गोड बोल जैसा निरशा दुधाचा खवा ॥ तिसरा महिना भरत आला श्रम करिता माशुकेडे ॥ १ ॥

उत्तरसी प्रति उत्तर व्हावें निजलीस का जागी । बौध्यरूपी बोलालिस नसावी चतुराई आंगीं ॥ काय आम्ही बोललो मनन कर मंदपणा त्यागी । परमेश्वरें दिधले हात पाय मग कां व्हावी पांगी ॥ प्रित करावी चतुर गुणस्त गुणरस रंगी । अमृत फळ त्या-सुन शुद्ध खातासि पिकली वांगी ॥ तुझ्या दिलाची गोष्ट राग नको येउ देऊं गडे ॥ २ ॥

धर्मन्याय सांगितला ऐकता चित्तीं हर्षावें । मान्य करून उप-चारे गुणिचे गुण घेत असावे ॥ कल्पवृक्ष पाहुन शितळ छायेखाली बसावे । त्यातील सारांश तो सुज्ञानांस पुसावें ॥ शिजवुनिया शरीरास आपुल्या अहो प्राण विसावे । तेव्हां आपण एकवेळ प्राण मित्रावर रुसावें ॥ पायाशुद्ध स्त्रियाचीं लक्षणें सांगितले उघडे ॥ ३ ॥

माझी एक विनंती ऐकुनि ध्यावी मजसाठीं । आसे नवें आसे वर्तावें सांगितल्या गोष्टी ॥ संतोष मजला झाला हे गुण आहेत तुझे पोटीं । प्रित साधी लोभ विनोद कीं घडून येईल दीष्टी ॥ हे उत्तर भंगील हा दोष ज्याचा त्या कडे । सगनभाऊ म्हणे सुखी असावे सोन्याचे चुडे ॥ ४ ॥

# मी वचनिं विकली जाइन तुमच्या करीं

( राग कालंगडा )

चाल:—तुझे वेड लागले मला अरे गुणि जना—

होनाजी

आवचिता राज अंबीरा दृष्टी पाहिला ॥ न्याहाळुनिया पाहतें चंद्र जसा उगवला ॥ ध्रु ॥

तुम्ही सर्व गुणसंपन्न माझे गुणनीधी ॥ मजविसी कल्पना नका धरू चित्तामधी ॥ मी दासि पदरची चरणी लागन अधी ॥ मसि कां बोलाना वेळ आहे कीं सुधी ॥ तुम्ही बौध्य रूपिका वसतां हारल्या बुद्धी ॥ चेतला मदन आग जाली शरीरामधी ॥ तुम्ही मुंज मुलखानाबाद आढळला मला ॥ न्याहाळुनि ॥ १ ॥

मी दासि पदरची लोळन चरणावरी ॥ मी वचनी विकली जाइन तुमच्या करी ॥ केसानें कापला गळा फेकिलिस सुरी ॥ भाल्याचि जखम मज लागुन गेली उरी ॥ जें कर्णे तेंच करावें सांगतें तरी ॥ वचनाचे साच कळुन आला आजवरी ॥ तुज पापी रकुरी जाले भोग भोगिला ॥ आसो कर्णेच होते कसा डाग लाविला ॥ २ ॥

ऐकुन घे नारी हासुन बोले साजना भरमाची मुठ तूं नको दाउस फोडून ॥ आम्ही कोण कुठिल राहणार सांगतों खूण ॥ बाळपणीं खेळ खेळत होतो हवसन ॥ हे अशा रीतीनें वागत होतो जपून ॥ कर शेवट नारी धरी तू अमुचे मन ॥ बळकग धरिला पदरास हाच दाखला ॥ जसा मोहना राणिनें बटाऊ हातीं घरीला ॥ ३ ॥

लागतां हातास हात चंचळ कामीना ॥ घाली ज्वहार अंगावर पिंजऱ्यांतिल मैना ॥ वेणी मुद राखडी मधी घोस माईना ॥ लाल गुंजावाणी डोळे जसें नयना ॥ तटतटित कंचुकी नेसुन शालू जुना ॥ पतीसंगे चारी प्रहर केली कर्मणा ॥ गुणी सगन भाऊ हरीपदी चरणी रंगेला ॥ रामा ह्मणे नारी शरण जावे विठ्ठला ॥ ४ ॥

———

# बाहार खुदा विसर गये

( राग कालंगडा )

चाल:...सखी शाम चले मथुरा नंदलाल दुलारे ।

होनाजी

शामभई राम तुजे आराम करेगा । पिहुजन पार अल्ला खैर करेगा ॥ धृ ॥

सुनत सखी पिहुन यका इष्क कहते । रुख सत् के वक्त कच्छु बयत कहेते ॥ रत् फरेकव बदंगीमो रयन भयेते । घोडे उपर स्वार हुयेते नयन भयते ॥ पलो सफलाय खुदा मेहेर करेगा ॥ १ ॥

हामपके गद्दर निंबु लागे दराने । हा मसे दुवागीर बने पिहू के बिराने ॥ हौस गये मोतनका चारा चरानें । स्वरस लगी पानी कीदर जाऊं चुरानें ॥ अल्फ सुखा पटकुंगी लहुंसे भरेगा ॥ २ ॥

डाग लगा कलीजे उपर पिहूं के कमलका । याह करो फौजा कुलजाव आलमका ॥ बान चुबान सनसमो हाय रे जालमका । छाती उपर वार जडा नयन बलमका ॥ बाहार खुदा विसर गये क्या तो करें गा ॥ ३ ॥

इंत जाय उन्मतसे भीलना तन मन । गय बगा आवान हुवा वहि हुसेन बह्मन ॥ नहीं उजेन पार गये है रे गुल चमन । पॉंच करो मक पुरे मीरज के समन ॥ सगनभाऊ मुरशदकू सिद्ध करेगा ॥ ४ ॥

---

# गोरे गाल मजा पहाल

( राग जंगला )

चाल... सवदा कर आवड गडे कां पडले सांकडे ॥

होनाजी

गोरे गाल मजा पाहाल जपुन चाल फाकडे ॥ धृ ॥

इष्क यार फार आम्हा छंद तुझा लागला । रंग पाहुन दंग झालो संग करूं चांगला ॥ शरीर गोल वजन तोल पाहूं तुझा मासला । उर छाती छबकदार नको पाहूं चहूंकडे ॥ १ ॥

चारी सोमवार मजा संगमावर पाहात जा । चौभौते लाल उभे मर्जीनें राहात जा ॥ रात्रळ गवळयाची चाल नित्य मुखीं गात जा । बिसर्नीच्या छब्यामधें टिकत चाल फुल झडे ॥ २ ॥

नवा करून थाट वाट बिसनीला घेरसी । ज्वारी बाजरीची जमिन जेव्हां तेव्हां पेरसी ॥ नेत्राच्या नखऱ्यामधिं दर्वीला घेरसीं । शरीरदान करूं कुणास नको पडूं देउ सांकडे ॥ ३ ॥

सकळ स्त्रियांमधें जोत तूं बनलिस पुतळी । चोळी तंग पाहुन रंग जशी रंभा भूतळीं ॥ नाथ सिद्ध सगनभाऊ कवन गाई रावळी । रामा दर्दीचे गुण चौमुलखी चौघडे ॥ ४ ॥

— —

# झाला हो वनवास

( राग संकीर्ण )

चाल:—गांवा जातो प्राणविसावा राहवा दोन गोष्टी –

होनाजी.

झाला हो वनवास पती गेले नवतीच्या पाहाणारा ॥ आतां कैचा राजा भरत्री भरतपुरच्या राहणारा ॥ ध्रु० ॥ कुंकु कपाळी शोभत नाहीं रत्नागिरीच्या ज्योतीबा ॥ माझे हे रूपस्वरूप पारखे झाले हे तोबा तोबा ॥ पसा पसा डोळयातुन पाणी एकसाळ पद्मनाभा ॥ जसा ताण्हुले काढी ढोसर तुळजापुरची जगदंबा ॥ डाहाळी जळुन कोळ जाती गळुन पडे भिंतीवर आंबा ॥ शापिले शंकरी काय रे आज्ञांकित तुमची रंभा ॥ पुनरपी उद्धार होऊन काय शेपावर निजणारा ॥ १ ॥

इंद्रादिक गांजिले दशकंठा जन्मामध्यें संव्हार ॥ मंदोदरी बोले रावणा नम्र होऊन जोडन कर ॥ मुळींच दुष्ट झालासी रामचंद्राशीं काम होइल बरें ॥ श्रम घडवीले रघुरायाला हे तुजला मुक्तीचे घर ॥ शरण रिघाला बिभीषण बंधु पाहुनीया सारासार ॥ चिरंजीव आद्यापी त्यासी आर्पिले राज्यभार ॥ पतीसहित मी दीन असता कसे लुटले रे लुटणारा ॥ २ ॥

काव्य ऐका श्रीकृष्णाचे कशीपुन यादव आपिले ॥ भागीरथीचे तीरी लढाई करून समग्र मारवीले ॥ दोन प्रहर रात्रीचे वेळे समाचार घेऊं ठरले ॥ धाय लोकलुन वृक्षाखाली चिंतातुर बसले ॥ तेव्हा किराते काय केले ॥ धनुष्य बाण ते क्षणी कसीले ॥ तळपायां तळहात मस्तक फोडून क्षितीवर लोळवीले ॥ बरें किराता जाउन सांगा सोमवंशीच्या झुंजणारा ॥६॥

अर्जुन बोले काय अज्ञा सांगावी राया धर्मा ॥ धर्म ह्मणे रे बंधुराया निरदयी व्हावें घनःश्यामा ॥ सुभद्रेच्या कांता काकुळती

येतो आत्मारामा ।। बाण काढा प्राण चालला यासमर्थी वाचिव आम्हा ॥ चतुरभुज नारायण त्याच्या गती आशा सीव सीव रामा ॥ काय पाड आमच्या राज्याचा ठावे असे लिहीले कर्मा ॥ जीवंत असो पतिराज ते नको भेटवूं भेटविणारा ॥ सगनभाऊ म्हणे सपुत कपुत कोण आहे रे झुंझणारा ॥ ४ ॥

---o---

# पराक्रमासारखी प्रीत करा

( राग भूपाळी )

होनाजी

चाल:—द्वादश वर्षे आंगीं पूर्ण भर नवती आली रंगा–

पुर्णे शेहर गुलजार मुशाफर म्हणे येथुन जाऊं ॥ बादशाई बेदर पाहु ॥ धृ० ॥ सीताकांत रघुनाथ रामरूपी स्वरूपी सूर्य जसा ॥ उभा रणमंडळी भीष्म जसा ॥ श्रीकृष्णासी केली प्रतिज्ञा सुदर्शन घेसा ॥ पार्थ वीर पाहील तमासा ॥ रथी मारुनी दाहा सहस्त्र देवा पांडवासहीत पळसा ॥ नेला पण सिद्धीस ऐसा ॥ चाल ॥ कीर्तीवान् कसे जाची प्रतिमा कलयुगीं ॥ देश दक्षिण बाकेराव राजाद्रिं सौभागी ॥ सांब वरदायक जो शुचीर्भूत भोके वैरागी ॥ अर्धांगी वामांगीसहीत संतोष सदा सेवूं ॥ पांडुरंगीं ज्याचा भाऊ ॥ १ ॥ धनी समर्थ महाराज स्वीया आम्ही दोघे गुणशांती ॥ एक वचनीं कोमळ कांती ॥ काय आम्ही चुकलो शेवला बोला प्राणपती ॥ रूख्याची अंतरती भक्ती ॥ प्राचीन नगर सोडुन जाता कोण ग्राम वस्ती ॥ तुम्हाला शुभ चिन्ह दिसती ॥ चाल ॥ स्वामी मर्जीनें आम्हाला तृप्त करुनी या जा ॥ विनोद नाद नानापरीचे भाषण गोड बोलुनी या जा ॥ सुखे लावुं वाटे आलींगन देऊन खुषाल जा ॥ पराक्रमासारखी प्रीत करा ॥ तुम्ही श्रीमंत राऊं ॥ कोणाच्या ग्रहीं नका राहुं ॥ २ ॥

अनेक सुर शिपाई, चपळता तेजाची भरली ॥ जसा उगवला सहस्त्र तरणी ॥ छत्र चाचचे चवरी मोर्चिल हातचीं हातरमरणी ॥ निघाला नमस्कार करुनी ॥ स्वरूपाकडे पाहवे ना वितळतो जागो जागीं आग्नी ॥ इंद्र लाजतो इंद्र भुवनीं ॥ चाल ॥ मुशाफर वेष घेऊन प्रपचीक वस्त्र आसमानी ॥ स्वार आश्वावरती श्याम कल्याणी चतुरगुणी ॥ ध्यान गंगेमाते शुद्ध मार्ग टोक्या आज गंगा तिरीं सुख पाहुं ॥ ३ ॥

प्रार्थना करुग गंगेची आमचे लक्ष तुझे ठायीं ॥ माय बहिण गे विठाबाई ॥ देसी विदेसी दो चौ महिन्या होता लवलाही ॥ प्रवा सावीण कर्मत नाहीं ॥ राज्यभार सोडून गोपीचंद झाला गोसावी॥ आमर काया जाणती शाई ॥ चाल ॥ कोणाची प्रीत कशी आंतरी जाऊन बेदर पहा ॥ पापशाई तक्त दौलताबाद अगोदर पाहा ॥ किर्ती सांगती तेथं कामशेनाचे गोपुर पाहा ॥ हरकुच गेले राव बाग पाहीला शितळ छाऊं ॥ उतरले तेथें उमराऊं ॥ ४ ॥

पाहुन दौलताबाद मनाची झाली संतुष्टी ॥ कीला बीन मोल उंबोरी ॥ सीरी प्रवास घेऊन निघाले ज्या कार्यासाठीं ॥ शहर बेदर पाहाया साठीं ॥ ललकारुन तुरुंग शाम कल्याणी एक गोष्टी ॥ तुझ्या आमच्या पडल्या गाठीं ॥ चाल ॥ बाग बंगला पाहुन पुढें निर्मळ बागर सिरा ॥ देवालय आंबेचे चमत्कारिक प्रयत्न करा ॥ आंबेच्या दर्शना नगर नारीचा समदाऊं ॥ त्या प्रज गोर्या खुण वाऊं ॥ ५ ॥

कल्पवृक्ष बंगल्याशेजारी पदार्थ इच्छीले ॥ गुण भूमिकेचें पादा वहीले ॥ सर्व सिद्ध साहीत्य होउनीया आनंदात बसले ॥ तेज सुर्यबिंब प्रकाशले ॥ जीवाभावाच्या विचित्र कांता त्यानें पाहीले ॥ ध्यान गंगेचे अंतरले ॥ चाल ॥ उभ्या राहिल्या पुढें चांदण्या चंद्र पाहुनिया मग्न ॥ स्वरुप न्याहाळुन सारे आंतरी संतोष निमग्न ॥ येकेमेकाल म्हणती कुमारी आम्ही लावूं लग्न ॥ उखा चित्रलेखा ह्मणे दावी चित्र लेहु लेहु ॥ प्रद्युम्न पाहतां तृप्त जेउं ॥ ६ ॥

मर्यादा ठेउन पुरत पाच्यारून सौंदर्या दिसते हिंदुपद्चर्या ॥ ह्मणें मुशाकर नका वीसरूं गुणींची गुणकार्या ॥ खोल आहे प्रीतीचा पर्या ॥ आह्मी वनांत फिरणार घरीं लावण्य दोन्ही भार्या ॥ दिल्ही स्त्रीचरीत्र क्रीया ॥चाल॥ गिता आठरा आध्यें आर्या मोरोपंताच्या ॥ त्यातली खुण जाणुन कल्पणा आंगी संताच्या ॥

थोर घरच्या पात्रा आहात तुम्ही भाग्यवंताच्या ॥ इष्क हा चांडाळ काळ महाकाळ वर धाऊं ॥ मग कैचा आठवें खाऊं ॥ ७ ॥

निराकारी दाखले आकारास आले तें ऐका ॥ नाहीं ठाउक नगर लोका ॥ सदाशीवाचा भक्त बाणासुर कन्या त्याची उखा ॥ सुगर मिळाली चित्रलेखा ॥ स्वप्नामध्ये प्रद्युन पाहतां प्रदीप्त परम सखा ॥ आहे पुराणी जाची टीका ॥ चाल ॥आहे माहीन स्वामी कल्पना जीवीच्या जीवलगा ॥ निपुण ज्ञानी पुर्ण माफ करोनी सोडा जागा ॥ बागर माणिक दुसरा समर्थाचें चित्ताजोगा ॥ गंगा चंद्रभ ागा पांडुरंगास नका भऊं ॥ पाक स्नेहा कोण ठेविल नाऊं ॥ ८ ॥

नाना यत्न प्रयत्न करूनी मोहिले सगुण मूर्ती ॥ गाऊन वचनी शर्ताशर्ती ॥ आपण जिवीच्या सख्या कुशळता दाऊं शुद्ध आर्ती ॥ इष्कसागरी आली भरती॥ गतपुरुषे शेहराची रचना पाहावी येश-कीर्ती ॥ कृपा बरी पूर्ण आग्हावर्ती ॥ चाल ॥ राव राजाद्रि म्हण धन्य तुमचाच्यातुर्यपणा ॥ आशा भगवंताची नाहीं सफळ कल्पना॥ सख्याला भाक दिधली फिरून ये रस्ता रानोवना ॥ पद कडवे कवन शोधनें आर्थ घेऊं घेऊं ॥ इष्क गातो सगन भाऊं ॥ ९ ॥

---

# आले माहेरचे पत्र

( राग यमन )

चाल:-हे सुवर्णचंपके तुजला सखे घडोघडी ॥

होनाजी

आले माहेरचे पत्र सख्याला विनवणी सांगा। कृपा असावी मजवर ऐशी प्रार्थना सांगा ॥ ध्रु ॥

मोकळे नाहीं पत्र लखोटे करून पाठविले।येताक्षणीं प्राणविसावा किंचीत जवळ नाहीं ठेविले ॥ दोन्ही कागद वाचुन पाहावें काम आहे लिहीले। आतमराज तुम्ही माझे तुमच्या इष्कामधें पोहोले ॥ जे हृदयाचे मित्र त्याला नाहीं सांगितलें। ही शवटची भेट मी तर मेल्याहुन मेले ॥ फार तुम्हाला छळीले जसे बोलीले तागा ॥ १ ॥

आयुष्य मर्यादा माझी काय आहे त्रिनेत्रा। निमे सख्याला द्यावें निश्चयें कमलोद्भवनेत्रा ॥ दरीद्र हारण केले ठवीले चांगले मित्रा। दिले घेतले तुमचे खातें ठावें सर्वत्रा ॥ त्वरा आता जायाचे घरीं यावें सत्पात्रा। गुणगोविंदे वाटे लावा सीरच्या सीर छत्रा ॥ जे झाले ते वरेंच झाले जिवीच्या जीवलगा ॥ २ ॥

काय तुझी उतराई होऊ सीर पदीं ठेवीले। सारें निरुपण सांगा सख्याला हंसाला नाहीलें ॥ षडरसी पक्वान्न मीष्टान्न सोवळ्यानें केले चरचरीत शाखा पात्रावर संतोष जेवीले। अमुका समुख भोजन केले ते आठवले ॥ आतां बरोबर कैसे जेवण प्राणाला मुकले। क्रियाभ्रष्ट झाल्यास धरित्री देइना नागा ॥ ३ ॥

खीसमतदाराच्या हातीं पत्रिका दिल्या भावार्थें। नानापरीचे करुन बोलणे घेउनया येथें ॥ मुखजबानी सांगितली ऐकीली रायानें तेथें। जमाखर्च मागेंच नाहीं वहीवर खातें ॥ जावे अथवा राहावे गरज नाहीं शोधुन पाहा पुरतें। तुमची क्रीया तुम्हास लागेल काय जाईल येथें ॥ सगनभाऊ म्हणे जायाचे कोण आहे सद्या जोगा। बौद्धरूपीं पंढरीस हरी तो स्मरा पांडुरंगा ॥ ४ ॥

# बोलणे मंजुळ मैनाचे

( राग भूपाळी, )

चाल-लटपट लटपट तुझें चालणें मोठे गडे नखऱ्याचे-

होनाजी

नट्टुनिथट्टुन चालशी रोख नको मारु नयनाचे ॥ बोलणे मंजुळ मैनाचे ॥ धृ० ॥

रंभापात्रा दिसें परंतु परोपरी सजली ॥ चाले ठुमकत चमकत बिजली ॥ लाल भडक वेणी सडक आत्ति चमेली मधीं भिजली ॥ कसुनि कटी पातळ दीड मजलीं ॥ दिव्य तनु राजेंद्र पाहुन मुखचंद्र सुरत धजली ॥ सरळ कुच कंचुकींत भिजली ॥ मृदु मृदु मंजुळ आवसन गायनाचे ॥ १ ॥

हांसते बसत चालण राजआंबीरा सिरा हस्ती ॥ आंगीं भर मदनाची मस्ती ॥ नखरणी दामोदरे नित्य तिसरे ताली वस्ती ॥ सदोदीत विषयाची कुस्ती ॥ आलख पलख मारी थवपी कमाना तीर कसुनि कस्ती ॥ आचपळ प्राणाशी होय तस्ती ॥ भोगुं म्हणतां विषय सांगड वांधु नेमाचे ॥ २ ॥

सर्व भूषणें करून सावरून वरून पदर सिरीचा ॥ खुलला भाळीं चंद्र सिरीचा ॥ उरस्थळी करि झटपट लटपट तो हार उरीचा ॥ कंचुकी रेखीव कांठ जरीचा ॥ लावण्याची सीमा मुखोटा तेज मान परीचा ॥ जणुं कां मणका सर्पासिरीचा ॥ कैक आर्जवी फिरता परंतु दैवी कोणाचे ॥ ३ ॥

जाई जुईची शेज फुलाची त्या मोगऱ्याची ॥ करवळी पाचया रंगाची ॥ प्रधानपुत्र हस्तकी धरता घडी एक प्रेमाची ॥ पुरविली मग इच्छा त्याची ॥ रावळ सिंधु म्हणे लावणी इष्टयाची ॥ प्रसंगी कविता ही कविची ॥ सगनभाऊचे कवन अमोलिक नाथ साप्रदाचे फोडले मडके रंगाऱ्याचे ॥ ४ ॥

---

# सखा रुसला जाते घरीं

( राग भूपाळी )

चाल— तुझ्या प्रितीचे दु ख मला दापूं नको रे—

होनाजी

कुठें गुजराथ कुठे शहर पुणे ख्याती करी ॥ सय झाली असेल सखा रुसल जाते घरीं ॥ धृ० ॥

याच्या किर्तिचे पत्र मला आले होते ॥ काय सांगु तुम्हा सांगा आम्हा भले होते ॥ काल रात्रीं स्वप्नांत धनी निजले होते ॥ नजर नजरानें शरीर गेंद दिल्हे होते ॥ मला मांडीवर घेऊन जणु म्हाले होते ॥ प्रेम प्याले रसभरीत गोड प्याले होते ॥ अन्न भुल मला तैसी मला भुल पडली ॥ वचन दिल्हे होते जाते सये झडकरि ॥ १ ॥

नजर काय नेऊं नेते नजर नेत्र दोन्ही ॥ भेट झाल्यावर पुढें ठेविन कुच दोन्ही ॥ त्याचे चरणावर शीरकमळ जोडून पाणी आजपरीयंत खात आलों अन्न पाणी ॥ सुररण सुरफंदी मतवाला आमचा धनी ॥ बालोबाल करीन खुष तृप्त नेत्र दोन्ही ॥ जेजूरीचा राव मल्हार आमचा धनी ॥ आली गोड ध्वनी जाते सये जलद करीं ॥ २ ॥

घाट कुसराचा वाट तळकोकणची ॥ झाडी कीर दाट एकसरे बनबनची ॥ वसई सुभा सितळ मार्ग तरी दातरची ॥ चला उतरूनीया वस्ती केले माहीमची ॥ चिंचणीतारापुर उंबरगांव दमनची ॥ काय तारीफ सांगावी दोन्ही किल्ल्याची ॥ नगर घनदेवी नवसरी दादासाहेबाची ॥ प्रथम मुजरा करूं पुकार बडोदे नगरीं ॥ ३ ॥

तप्ती वांगदेव सुरत शहर बाजुला ॥ कुच करुनि दरकुच आलो भडोचला ॥ तेथे आदी माया नरमदा ही संताला ॥ भावे करुनि

वंदुनि जीव संतोषला ॥ मीयागांव सोडून मार्तंड जेजुरीला ॥ एक रात्र तेथे कार्मिली श्रम हरिला ॥ माझी आर्जी जाउन सांगा दादासाहेबाला ॥ चिठी झाप्याची घ्यावी जलद कृपा करी ॥ ४ ॥

राव समशेर बहाद्दर कां आया हालकारा ॥ चलो याद किया साहेबने ललकारा ॥ परिजात करिन कुल ज्वाहार नग सारा ॥ सब दख्खनके लही जा कलु लग प्यारा ॥ नीगा होती कीं सात धनी लेऊं मुजरा ॥ बिर वडोदा देखनकु खडा जग सारा ॥ कडे तोडे पोषाख दिये नांव तेरा ॥ सगन भाऊ कहे यमा की छेव न्यारी ॥ ५ ॥

— ——

# जलभरके प्यारी उठे

( राग संकीर्ण )

चाल —गडे गुलनार गुलचमन निसीचा रमग ॥

होनाजी

चली नेर भरन मखमोल कमलका फुल हात पिंजरा मैनाका लिया ॥ खुप बनी महेबुप बिचनर नयनोंने गचब किया ॥ धृ० ॥

सब जदे किया पांपाख बडी बडी आख नाकमे नखनीं जडु राखीसे गले मोतीलन की माल लटक रही त्रिवन हाल पर चले॥ सुनके कंगन हात आसल गुजराथ चला एक जाय चौक मे झूले॥ मारे नयन तडाखे आपक देख जमनिपर भुले ॥ चाल ॥ लेचलापन घटपर बिजली पिंजरा आलख किनारेपर धरे ॥ छम छनन बाजे पैंजन पग मे लखा खबूतर झुरे ॥ चला जलभरनेकू नादर पठीया कुदकाद जलभरे ॥ किन्ने शहरका दिलदार मुशाफर यार प्यास लगी पाणी पीने आया ॥ १ ॥

जलभरके प्यारी उठे महीताप लुटी कहे मोहना लेऊं सीरदर घडा ॥ नयनसें नयन मिला के मिले देख मुशाफर खडा ॥ चाप क्यौं रोती गुणपरी इपककी सुगी कैक तेरे सवाल कां तीर जडा ॥ सलाम लेव छबिले गबरू ठयेरके च्यावुक भीडा ॥ चाल ॥ किन्नेक बक्षीके पुत तुमारी ज्वानी सलामत रहो ॥ कसमरि मे नखरा उदेपुर बस्ती महाल कहो ॥ यवकहे सखी मुख सा बान लाल तुम एक दीन मंदिर रहो ॥ मोहना की मिटी जुबान तनमकों जान सुन पंचीका जीनर भया ॥ २ ॥

मय कहूं तूं सकुन पछा नरहो देमें छान देखने नीकला दखन बतन ॥ हुशारहो के खडे रहो प्यारे सुन केल गुल रतन ॥ तुम ज्याब कहोजी प्रभुराज गुलछना बाज निमोना शहर हमारा बतन ॥ महल खडे है सब कंचनके आव लग किये जतन ॥ चाल ॥ सब छोड दिया सनसार इपकेबातर क्या कहूं बयान ॥ मथुरा बिंद्रावन घाट न्हायके तेरे दुर्शनके शरान ॥ उजन एक बम्हाण-

पुर शहर पुछेमें था एक मकान ॥ क्या कहूं कुच कत्या न न जाय ॥ बद्नार हा ये सुवे कलीना कबा वह था ॥ ३ ॥

चतुरसे चतुर मिला चांदसे खुला ॥ एक पर एक हो गये कीदा ॥ चला महेलमें पितम प्यारे मोहोबत का जुग बाधा ॥ मतवाल कुच दिलमे खोप बद्नमे खीलाप तुमारेसे नाहीं जान जुदा ॥ इष्क करूंगी पोचा बंदे खाजे न वाजे खुदा ॥ चाल ॥ ले· गये मंदीरमो रफी खवारी सेज फुलो के घटा ॥ प्यार पोर गुजर गये रयन चथनसे आपकने रंग लुटा ॥ बाला राञुके ख्याल चमकते झुकते गाते मिठा ॥ भाऊ सगन गाते ख्याल बजे चौताल मिजालस रामानें खुब किया ॥ ४ ॥



# मी तर कळीं किं जाईची

( राग भुपाळी )

चालः—ऊठ रंग लूट जाहली अग्न देहाची

होनाजी

उभी द्वारीं मी वाट किती पाहूं ॥ पंचप्राण तुम्ही रत्न कोठें ठेऊं ॥ वरकांतीची प्रित नको दावूं ॥ इष्क करा पुरा जरा नको भिऊं ॥ धृ ॥

मदनबाण तुम्ही मी कळी जाईची ॥ तुला पाहाता होती अग्न देहाची ॥ खुण मुद्रा ही बाळपणाची ॥ आशा तृप्त करा मज दीनाची ॥ बसा सेजारी आवडमनाची ॥ इष्क करा पुरा मी भुलली मिन्याची ॥ द्रीष्टी पाहता किती आलाप बला घेऊं ॥ मला सोडुनिया नका जाऊं ॥ १ ॥

परी जात करुन भाइ जवळ या हो ॥ मला घेउनिया पलंगी बसा हो ॥ वस्त्र आरमानी झटपट आज त्या हो ॥ आप हास्तें हातीं गेंद हाता लाहो ॥ करीन नखरा आज इष्क चेतला हो ॥ मज दुरबळास माल गवसला हो ॥ विषयबाण भेदला कोणास होऊं ॥ शरीर दान करिन कोठें तुला पाहूं ॥ २ ॥

सुभरा चांदण्यामध्यें वाट तुझी पाहाते ॥ बसुन झुरक्यांत मार्ग न्याहाळितें ॥ केव्हां याल लाल पेहेरावा मी करिते ॥ नग डागीनें चकचकाटणें कतें ॥ राव बनसीचे दरशान आधीं घेते ॥ भाव गतींचा दाऊन पुढें येतें ॥ मिठी घालुनीया मुखचुंबन देऊं ॥ सोडा राग भाग नका दुर जाऊं ॥ ३ ॥

सखा चमकुन हातीं धरीला पूतळीनें ॥ नेला मांदिरांत हर्ष युक्तीनें ॥ बसा शेजारीं जवळ मला घेणें ॥ आंगसंग घेईन कृपा द्रीष्टी पाहाणे ॥ लक्ष माझे मी थोरा घरचे केणें ॥ सगन भाऊचे गुण ऐकुन घेणें ॥ रामा दर्दीचे नवें छंद गाऊं ॥ गुरुनाथ सिद्ध प्रसंगांत ध्याऊं ॥ ४ ॥

———

# उत्तरचा रहिवाशी

( राग संकीर्ण )

चाल--सख्या तुम्ही पुणें पाहिले श्रीमंताचे

--होनाजी

काशीचे राहाणार मुशाफर पंछी प्रवास गबरूं ॥ नाहीं पाहिले गुलछनाबाद पाहावे यास्तव झालें स्वारूं ॥ ध्रु० ॥

प्रातःकाळीं प्रवास होणे ॥ आडीच प्रहर रात्र झाल्यावर एकांत एकतांसि पट्टराणी ॥ स्वप्न दावील भगवंतानें ॥ मनांत होती कल्पना लाडेसाहा सुभे दक्षिण एक वेळ पाहाणें ॥ कोमळ कांती राजस वदने ॥ करार झाला निश्चय जाता आम्हाला लागतील साहा महिनें ॥ संगें कांहीं नको दलभारू ॥ १ ॥

घोडा सांगा सुज्ञानी ॥ जिनावर भरगच्ची कलावतूचे जडले हिरा मिन्याचे पाणी ॥ कलगी सूर्यपान मुलतानी ॥ गळयांत ताईत्या पेट्या आकबरी मोहरा पायी तोरड्या तुफानी ॥ आपण केला थाट पठानीं ॥ तेव्हां अश्वावर स्वार झाली राव राजींद्र हिंदुस्थानीं ॥ हातांत भाला पांच हातीं आरूं ॥ २ ॥

दर कूच चालले राजींद्र ॥ मार्गावरल्या नगरस्त्रिया टकमक पाहताच उगवला चंद्र ॥ कोण्या पट्टराणीचा भोगींद्र ॥ आमर पुरीचा राजा कोणी पाहिला दिसतो प्रत्यक्ष इंद्र ॥ मर्यादा आंगी क्षीर समुद्र ॥ एकमेकीला पुसती तारामतीचा होता असा हारिश्चंद्र ॥ भव्य स्वरूप घना कर तारू ॥ ३ ॥

इष्क बाज सावळी मूर्त ॥ उज्जनी बऱ्हानपुरची मजा पाहुनी आसे पैठणांत ॥ स्वामी पाहावा एकनाथ ॥ स्नान गंगेचे करून दर्शन घ्यावे ज्या घरीं पंढरीनाथ ॥ राहे ज्या देत कळावें घेत ॥ दुरून पाहिले गुळछनाबाद देहांत लागुनी गेली ज्योत ॥ भंवते बाग मध्यसी शेहरूं ॥ ॥ ४ ॥

खबर कळली नगर स्त्रीयासी ॥ बारवे तिरीं मुशाफर उतरला उत्तरचा रहीवाशी ॥ शेपभास आल्या पाहाण्यासी ॥ सिरी घागर राण्याचा चंबू मोकळे हात सगुण गुणराशी ॥ प्रजन्यकाळीं चपळ आकाशीं ॥ फेंकसी नोक एकसारखी बरोबर नेत्राची बुंद-खाशी ॥ तयासी बोले मुशाफर चारू ॥ लावणी सगन भाऊची ॥ जडणी रसीक दुधारी गहेर वारूं ॥ ५ ॥



# जाळा वाचुन कड येईना

( राग संकीर्ण. )

चालः—विषय नावरे मन बावरे होऊन खांब

होनाजी

माया नाहीं लोभ नाहीं ऐसी कां गे सरस्वती ॥ नाहीं लागत साजण हाती ॥ धृ० ॥

मन इच्छेचे भोजन पात्री दीप तस्तामधी मालवे ॥ शरीर काळीज कालवे ॥ डावी पापणी लवतां राहिली उजवी बाही पापणी लवे ॥ कर्म घेते हेलावे ॥ थरकारून विलविलाट करतां तांबर भोवती तोलावें ॥ कसुन कटोरे खोलावे ॥ माझे काळे पोळे करतां सुंदर येती काकुळती ॥ १ ॥

निजणे बसणे आसले तर आसो ॥ नसले तर नसो देवा रे ॥ पोटांत सुटले हे वारे ॥ बारेंदरी केदार इच्छीले होईन एकदा बरभार ॥ जडो सख्यासी वेव्हार ॥ पतीचे दिल चित्ती दिले सोडखत दुसरी पाहिली आरबार ॥ कापुन घेइन तलवारे ॥ माझ्या प्रितीवरी बिजली पडली खाउनि निजते आकुती ॥ २ ॥

आस्त्रीचा तळतळाट कठिण स्त्रिहत्या वाईट मोठी ॥ कोण म्हणेल वार्ता खोटी ॥ धमकाउनि सांगा वायानों केकाची गेली पागोटी ॥ तुमची होईल गुरगोटी ॥ हे कळकटल्या आंगाचे गांडरूं जग म्हणती बाबर होटी ॥ काय पडलीस काळी सट्टी ॥ निंद ही रांड सवत माझी तोंडांत पडो इच्या धुळमाती ॥ ३ ॥

जाळा वाचुन कड येईना मायावाचुन कोण रडत ॥ जखमी मानुस तरफडत आता अंत कां पाहाता माझा सांगा हितगुज आवडत ॥ उतरा नदी पाणी चढत ॥ करुनाकर शब्द बोलून आले शयनी दुडदुडत ॥ हातीं आले खाते बुडत ॥ सगनभाऊचे गुण ऐकुनिया ॥ उडया घालती आतीरती ॥ मुलखावर ज्याच्या किर्ती ॥ ४ ॥

———

# विनंती अर्ज

( राग संकीर्ण )

चाल:—उद्या जातील स्वामी०......इ.

—होनाजी

चित्तापासुनि प्राण सख्याला आर्ज विनंती माझी ।। रसातळी बसविले आझुन कां पाठ पुरविली माझी ॥ धृ० ॥ तुम्ही कुटुंबवत्सल तुम्हासी प्रीत करू नये केली॥ कसें पुढें होईल कळेना ठाई गोष्टहि गेली ।। रात्रंदिवस घोर पतीचा कधि तरी जाईन मेली ।। माझ्यावरच्या वाट साखरा होईन ख्याली खुषाली ॥ वेल मांडवावर जाईचा जाई गुंतल वेली ॥ जाणून बुजून कळी तोडिता गळून भूमीवर पडली ॥ आकल गुंग कशास्तव जाहाली कां बोलाना दाजी ।। बरें दिसल तें करा ज्यामधीं पंढरीनाथ राजी ॥ चित्तापासुनि प्राण० ॥ १ ॥

कथा किर्तनी नित्य जाता सारसारल्या गोष्टी ॥ अर्थ करून सांगते उभयताची होते संतुष्टी ।। शब्द कसे मुक्ताफळ केवळ होती अमृतवृष्टी ।। मुळमाया सोडून बरळता दाविता कड आष्टी ।। ब्रह्मज्ञान कथुन कांहीं जोत पडेना दृष्टी ॥ नांव ठेवाया जागा नाहीं वेडी मी होते कष्टी ॥ कर्णे प्राप्त तुझा आम्हासी प्रितराव ऐकोजी ॥ घरकुटुंब सांभाळून क्षणभर बसवेना बसले जी ।। २ ॥

वजनदार भार न सुद उत्तर केले धरून फुगाई ।। ज्वारि बाजरी रोगी गव्हाची जाहाली नाहीं सुगाई ।। गुजराथ किं हो हिंदुस्थानापासुनि आणली लुगाई।अलंकारभूषणें दिल्यावर ठेवले नांव नगाई॥ जडाव नग तेजी म्हणतां पैसा कारते उगाई ।। पाक स्नेहाचा पैका आम्हावर नाहि घेतला करजी ॥ कसा देईल देणार आमुची प्रित आहे बिनव्याजी ॥ ३ ॥

देयाघेयाचा उदिम झाला लज्जा का वेव्हारी ॥ ते कांहीं घडलें नाहीं बबरा केला मोठा भारी ॥ डोळयानें पाहिले पदर पसरून मागितली वारी ॥ नाहीं करूना आलि परंतु भाषण एक जिव्हारी॥ न्हाण आल्यास चवथे वर्ष नाहीं कर्ण कुवारी ॥ लेकुरवाळी दिले दाखले खोवले बोल जिव्हारी ॥ आंधळें मुके बहिरे त्याजमधिं संतध्वनीची बाजी ॥ सगनभाऊ म्हणे नका करूं फळ नाहीं बिघडल मर्जी ॥ ४ ॥



# मनांत हसले ग बाई हंसले

( राग संकीर्ण )

चालः—सुखांत निजले बाई ॥ निजले०

होनाजी

मनांत हांसले ग बाई हसले ॥ जाणूनबुजून फसले ॥ धृ० ॥

लुगडे निरीत फिटले ॥ भ्याले तोंडाला पाणी सुटले ॥ मलखांबासी झटले ॥ मिठी उभयतांचे खटले ॥ सोने आगीत आटले ॥ काम शरीरी समघ्घी मिटले ॥ दोही मांडिच्या मध्यें हसले ॥ १ ॥

इष्कयार मतवाले ॥ दरदी शांती सुख मन धाले ॥ जहरी विषाचे प्याले ॥ किति तरी सोसु जखमी झाले ॥ होती किल्यावर ॥ हल्ले खबुतर लोटन घेती पल्ले ॥ उरीं गेंद रसरसले ॥ २ ॥

भर नवती छातीवर गोळा ॥ मद कांडे चरकी गाळा ॥ खेळी मेळी गंजिफा चाळा ॥ खूबसुरत चित्रशाळा ॥ पापणी लवती माझा डोळा ॥ रणामधें समशेर चमके चपळा ॥ रंगमहालामधे बसले ॥ ३ ॥

प्रेमरसाची गोडी ॥ आकाशीं आंबा पिकला पाडी ॥ द्रव्य नको रथ गाडा ॥ बागबगीच्यामाधि फुलझाडी ॥ रंगरस गाती धाडी ॥ नारळी फणसी ताडी माडी ॥ गुणी सगन भाऊचे मसले ॥ ४ ॥

— —

# नावडतिची साखर आळणी

( राग विलावर )

चाल—आजन्मे सुख पावले शेवटीं निमग्न०।

होनाजी

कुठे करमेली रात्र सांग रे वात सारिते मुखाकडे ॥ कां निजलासी पाठमोरा हात येऊं द्या खव्याकडे ॥ धृ० ॥

निजल्या निजल्या काय मी बोलूं उठून बसते पाय ते ॥ तुम्ही स्वस्त घ्या झोंप रेप चापेचें कोमजल्या गाते ॥ उजवे अंग द्या सोडुन डाव्या आंगावरती घ्या कलते ॥ देठापुन काळीज लखलखते शरीर पोटऱ्या थरारती ॥ जगप्रसिद्ध हे वर्म जाणोन केले कर्म कोण्या रिती ॥ मित्र बरोबर तुमच्या होता किं नवता सांगा प्राणपती ॥ नावडतीची साखर आळणी आसे काहो कुडे पावडे ॥ १ ॥

गुळ नाहीं गोड सीवाचा राव तुम्ही निद्रिस्त कां जागे आसा ॥ नाहीं तरी निमित्त घेऊन झोपेचे काय बोलते मग पुसा ॥ प्रधान पुत्र यकुळता एक त्याचा सत्वगुण आसा ॥ चोरी केल्यावाचुन सजणा आरुण उदय होईल कसा ॥ तेव्हां पित्यानें मंत्र शिकविला- किंचित वर्मी मिन जसा ॥ माणिक मोती सुवर्ण उचलुन दचकुन टाकी उसासा ॥ आखर शेवटीं साळीच्या कोंड्याचे चोरिले गाठोडे ॥ २ ॥

तुरुतदान महा पुण्य म्हणावें कैसा दाता धर्मकरी ॥ येजीचे उसने सवेच देणें आहे सवाई समशेरी ॥ धर्मराज महाराज सौमवासींचे हस्तनापुरी चौखलाचा वारणा करून वाणे घेऊन गेली गांधारी ॥ कोंती माता म्हणे भीमासी जारे बापा इंद्रपुरी ॥ आईरावतासी आणि पछाडून परत वाण कौरवा घरीं ॥ विभीचयार कर्मास आसे दृष्टांत पापपुण्य कोणाकडे ॥ ३ ॥

गोडीनें गोड शब्द मन वानवले मनाचें साक्षीनें ॥ रुसा सखी

पोटासि धरूनिया पदरीं घेतले पापपुण्यें ॥ हें मंदिर द्या सोडून दुसरें मंदिर सुंदर सहस्त्रा गुणे ॥ सर्व सिद्ध साहित्य न्युनता नाहीं नानापरि सुमनें ॥ तिन प्रहर विनोद गुजरले चौथे प्रहरी सिता-पीनें ॥ कामचेतना शांत झाली उभयता राजस वदने ॥ पाहिले नाहीं रविनें केले कविनें कसे काय हे कोडे ॥ सगनभाऊ म्हणे होनाजी बाळा उत्तर द्यावे रोकडे ॥ ४ ॥



# कशि जाउ सखे यात्रेला

( राग भूपाळी )

चाल-आहो प्राणपती मी तुमची प्रियकर अबला.

होनाजी

मी सवासिनी कसी जाऊं सखे यात्रेला ॥ लुब्धले तुझ्या सुरतेला कसे करूं ॥ धृ० ॥

तुझ्या आधी जाईन पंढरीला चुरसा चुरसी ॥ आंगणांत झाले दुरसी कसे करूं ॥ लोका ज्या पाहुन स्त्रीया तिला फुरफुरसी ॥ मनच्या मनांत चुरमुरसी झुरझुरूं ॥ बोलण्यामध आटोपेनास बोलुन उरसी ॥ हा मिथ्या वाद तूं करसी फिराफिरूं ॥ चाल ॥ ह्या आहेत चाली तुमच्या ठाउक पहिल्या स्वामीराया ॥ जा पंढरीस ह्या गोष्टी सोडून दुरल्या स्वामीराया ॥ आम्ही स्त्रीया जात छळनुक करिते मैलेला ॥ १ ॥

जे होयाचे ते होऊ दोघे जाऊ ॥ अंतरले वापभाऊ तुजवीन ॥ दोघाचे दोन घोडे सजउन घेऊ ॥ पंढरपुर विठल पाहूं विनऊन ॥ तु कळलीस बे वचनी माया लाऊं ॥ तुझी क्रिया नाहीं शुद्ध राहूं म्हणऊन ॥ चाल ॥ इमान देऊन वचनात गोविले मजला ॥ राजस वदने ॥ तुझ्यापायीं म्या संसार आवघा तुजला ॥ राजस वदने ॥ कोण घटका लागली म्हणुन जिव रिझला ॥ राजस वदने ॥ एक दिवस नाहि टिकणार तुझ्या खात्रीला ॥ २ ॥

सखी सांगे सख्याप्रति आर्जवून मर्जी ॥ मी नव्हे मतलब गर्जी जावलगी ॥ या शहर पुण्याच्या स्त्रिया गोड वर वर जी ॥ हात फिरविल तोंडावर जी पुढें बगा ॥ हा भरमाचा भोपळा आहे आजवर जी ॥ न कळे फुटेल हा गरजी पुढें दगा ॥ चाल ॥ या काळीं प्रीत चालवणें तुजला आमची प्रियकर राघु ॥ पुढें बग न कोर्णा मिळेल तुला फुकाची ॥ प्रियकर राघु ॥ राहिली क्रिया

फेरफार गोष्ट लाखाची ॥ प्रियकर राघु ॥ या कर्मे लागेल बट्टा कुळगोत्रला ।। ३ ॥

रतु चौथा दिवस प्रातःकाळीं न्हाऊं ॥ खुषबोई अत्तर लावु राजसा ॥ अनुभवें एकविचारें उभयता येऊं ।। दरकुच पोहचले जाऊ सा दिवसा ।। केले चंद्रभागेचे स्नान क्रिया घेऊं ॥ तुळसी पत्र वेल वाहू विठ्ठला ।। रावळांत जाऊन अर्ज विनंती केली ॥ प्रियकर राघु ।। कवी सिद्धनाथ म्हणे आशा पूर्ण झाली ॥ प्रियकर राघु ॥ गुणी सगनभाऊत्रे करून चंद्री नेत्रेला ।। म्हणे बिबन या यात्रेला ।। जिवलगा ॥ मि शीवनासी कशी जाऊ सखे यात्रेला ॥ ४ ॥

———

# तुझ्या आंगीं इष्काच्या कळा

( राग लीलांबरी. )

चाल—बहुता दिवसा मज दुबळीवर पायधूळ

होनाजी.

प्रांत पुणेकडे पटारचे राहणार पंढरीस जाऊ ॥ जिवाला घोर सखे नको लावू ॥ धृ० ॥ तुजवर आमची प्रित कसी तुज ठावे आहे कीं नाहीं ॥ जिवाला शोध करून पाही ॥ आज्ञा मोडून कधीं तुह्मी आम्ही परग्रही गेलो नाहीं ॥ उभयताचे मन देते ग्वाही ॥ चवथा दिवस सरला पांचवे दिवसी कळले कांहीं ॥ पतिसंगे रम जा येक ठायीं ॥ चाल ॥ मनांत शोधुन पाहावे ॥ उतरलो तुका सखे सद्भावे ॥ पुढे गुग काय म्हणुन विसरावे ॥ आणखी भेटु नेत्र घेती लाहु ॥ १ ॥

डोळ्यास आल पाणी येकता चपळा आकांत करी ॥ जिवाला का श्रम देता भारी ॥ चैत्रशुद्ध शुभवेळा त्रयोदशी दिन रवीवारी ॥ भाषण केले तिसरे प्रहरी ॥ मला बरोबर न्यावें निश्चय ठरला कारभारी ॥ हर्षयुक्त पाहावी पंढरी ॥ चाल ॥ मनचे मनांत ठेवा ॥ पुरविली आस्ता नाहिं देवा ॥ भरवसा देऊनी जाता गावा॥ करुणाकर मी गरीव माऊं ॥ २ ॥

ठाव घेतला नाही ठाव लागेना आस्तेविण ॥ जिव मिळल्यावर माहित खुण ॥ निमेशिमे गुग ठसते त्यांत सासुबाईचे चारीन ॥ सवड पाहुन होते बोलणे करी करवाला पाहु सखे इच्छीले चित्तापुन ॥ हासु लागतिल सकळ जन ॥ ॥ मला घालतील डोई ॥ मग आठवावे कृष्णाबाई ॥ श्रम फुटल्यावर होईल काऊ काऊ ॥ ३ ॥

मनोमन साक्ष आहे तुझ्या आंगी इष्काच्या कळा ॥ भेटल्या नाही सखे वेल्हाळा ॥ आपली कुडी सजनाचा आत्मा एक दिसे

कनवाळा ॥ तेव्हा पचवील विषाचा गोळा ॥ आकाश जरी कड-
कडले डंष तक्षके तोडला डोळा ॥ पार पाडील हरी सावळा
॥ चाल ॥ सूचना मात्र ग्रहसम ॥ केली नाही पुरविली आस्ता ॥
चातुरमास कामिले गुदस्ता ॥ तेही कळले प्राण घुलाऊं ॥ सगन-
भाऊ म्हणे कार्तिक मासी जे घडेल ते पाहुं ॥ एक वेळ पंढरी
दाऊं ॥ ४ ॥



# नवी होती कां जुनी होती ?

( राग सर्कीर्ण. )

चाल—जाइजुइच्या फुला राजसा तुला

होनाजी

कसुन मारिला बाण भेदला जाण या जिव्हारी ॥ मी कमान मुळतानी वान हा कळला वेव्हारी ॥ ध्रु० ॥ पडत झडत आज आला कोणीकुन उतरला चेहरा ॥ चोरटी पाउले वोळखली वराचतिचोरा ॥ बारा द्वारा फिरून आला की येकीवर फेरा ॥ लटपटींत पगडीचा पेच घामेजला घे वारा ॥ चौकड्याचे मोती विष्कळाति सईलावल्या तारा ॥ भीगबाळीचा लोलक ढळला तुझीया सुकुमारा ॥ नवीच होती का जुनीच होती तुमची कुवारी ॥ १ ॥

काळ्या सावळ्या गोऱ्या भुरक्या लहान खुऱ्या ढुंगण्या ॥ झडा पडून घेरतील सख्या कोवळ्या बारिक चिमण्या ॥ एकीमेकीला वर्म समजला लावतील फुणग्या ॥ आहे स्वरूपाची हाण बसावे तशा गाळीत थीणग्या ॥ भरपुर भरल्या भरून उरल्या दाण्याच्या कणग्या ॥ ह्या रांडा घरघाल्या जैशा शेतावर बणग्या ॥ लोणकडे शुद्ध नाहीं कट्टूपणाची मवारी ॥ २ ॥

हिरवी पिवळी लाल काजळी कोरी ताजी घडी ॥ नग्न करून नेशिवता आनंदे घालितात फुगडी ॥ हर्षानें वोळविता देउन द्रव्याची गठडी ॥ मला बातमी कळली तुमची प्राण जीवाचा गडी॥ दो घटकेचे सुख शेवटीं मी पडले उघडी ॥ प्रीत घरोघर नाहि लुटून खातील सीरची पगडी ॥ लुटून फस्त करतील नेतील पलंगाच्या नवारी ॥ ३ ॥

मर्जी रक्षून बरीच बोलतीस घेतलीस झडती ॥ इष्काची समशेर असली पेशवे लढती ॥ पंचप्राण अर्पिले आमुचे केव्हा दोष

हरती ॥ तुझ्या मनामधें सवाई दौलत जास्त असो बदती ॥ ईष्कामधिं तूं धुंदफुंद आरक्त नेत्र चढती ॥ मग मस्तक ठणकत समजल्यावर निचींत पडली ॥ कव्ळी सँग चवळींची कोण सेविता गवारी ॥ सगनभाऊ म्हणे समजल तर घर राखा वेव्हारी ॥ कसुन मारला बाण भेदल जिव्हारी ॥ ४ ॥



# ये मन मोहना

## ( राग बिभास. )

चाल—मम प्रिय दारा का जासी परके द्वारा.

होनाजी.

भोग्या भवरा का करितो आमुचा मारा रे ॥ ध्रु० ॥ ये मन मोहना पाहिलास पुरता चवनारे ॥ ऐक जीवना याणें खोडिलास हिरवा दवनारे ॥ भरली पवना कसी उतरूं राजीवनयनारे ॥ १ ॥

अरे महाशंखा मारिलास विषयपंखा ॥ काढलीस आग का लई जालीस सुक्ष्म आलंकारे ॥ वाजवूं डंका आज होईना लर्दाई झुणकारे ॥ धर्मशिळेवर पाय ठेवीता दाहा शरीरा का करितो ॥२॥

स्वप्नीं वचका परक्याचा वसतो दचका रे ॥ कंबर लचका करिन करी कान्हा झुचकारे ॥ घेऊं गालगुचका उपटिन शेंडीचा बुचका रे ॥ हातीं घ्या दर्पण का जाहलास करेड भवरारे ॥ का करितो ॥ ३ ॥

नकली वकलाभोवताली करितो नकला रे ॥ अंबा पिकला आंत रेषाचा खुण भकला रे ॥ दुर्गुण शिकला गुणी सज्जन पाहुन झुकला रे ॥ सगन भीऊचे गुण भरपुर सीवरा भीवरा रे ॥ ४ ॥



# माझी ओटी भराग

## ( राग बिभास )

चाल-डाग लावूं नका जाता माझी सोय करा.

होनाजी

पत्र लिहू नका जाते का जाते सये वाट करा रे ॥ येथुन त्वरे माहेरासी हेची मागणे तुम्हासी माझी वोटी भरा गे ॥ धृ० ॥

फळशोभन केल्यास जाले महीने साहा गे ॥ आसे आनंदांत स्वामी माझे दिवस दाहा गे ॥ पुढें जायाचे ठरले बसुन नवती पाहा गे ॥ असी बोलली सख्यास राघू गृहीच राहा गे ॥ चाल ॥ कारे धरियली उदासी फोडुन टाकीन मस्तकासी ॥ नाहीं ठरत जरा रे ॥ १ ॥

मला विसरी पाडून घात केला कसा गे ॥ तुम्ही जातीचंताच्या छाया खाली बसा गे ॥ झाला वर्तमान स्वस्थपणें निवळ पुसा गे। हारणी चुकली कळपांत धुंडित दाही दिशा गे ॥ चाल ॥ राघोविण सखियासी अन्नपाणी गोड जहाले लागत नाहीं जरा गे ॥२॥

या मागें पत्र लिहीले होते काय त्यासीं गे ॥ एक मास दिवस पति राज गृहीं नाहीं आले रे॥ बरें दिसत नाहीं खरेच आतां मरण आले रे ॥ प्राण वाचवा असी मुक्त बहुत बरी रे ॥ चाल ॥ प्रश्न पुसा ब्राह्मणासी द्रव्य देऊनी विषशी उठा त्वरें जलदी करा रे ॥ ३ ॥

विप्र बोले जा शरण तु अंजनीसूता रे ॥ राम करिल तुझी शांती नको करूं शोक व्रथा रे ॥ चार योजन पतीजवळ आले हर्ष चित्ता रे ॥ आज सोन्याचा दिवस चढल रत्न हाता रे ॥ चाल ॥ सगनभाऊच्या कवनासी सगर चाहाती राजबनसी रसीक गोड सीरा रे ॥ ४ ॥



# सुख आठवीन पतिचें

( राग कलंगडा )

चाल —नुनन बाहार नवतीचा जातो शरिर रवी.

होनाजी

माहालातुनि मि बाहेर आले चैन पडेना आंगणी ॥ धृ० ॥

काय आवस्ता जाली माझे शरिर हे खवखवते ॥ यास्तव बाहेर आले सख्यानों चरित्र ऐका सवते ॥ सुखदुःख चोरित नाहीं फळापुष्पावाणी पुढें ठेविते ॥ उभ्या कशाला राहाता वसावें स्वस्तपणें चौभोतें ॥ कवळी ग माझी ज्वानी रुताला करकरा लवते ॥ हें लवणी स्थीर करिल कोण बाई सांगा वचनीं गोवीते ॥ जसे दंत सळसळते गुदगुल्या करते जोबन दोन्ही ॥ १ ॥

कामचेतना जाहाली शरीरी विशेष आग्र होती ॥ कंचरेत प्रिया निऱ्या भिजल्या चोळी भिजली छाती ॥ सर्पमधें गजराज टोचिती भाले जखमी होती ॥ त्या जखमेचा गुलान नाहीं अुकत चालला हत्ती ॥ मि वाहेर पडल्यावर भोवती लोक तमाशा पाहाती ॥ तसीच कळ सोशीते परंतु आम्ही अबरूंच्या गरती ॥ चांगले दिवस येतील केव्हां येऊन सांगा कानीं ॥ २ ॥

रंग माहालातील पलंग बिछोने गाद्यागिरद्या ॥ खाशा वैऱ्यावाणी पाठि लागतें आणखी उषा उसोशा ॥ नग डागीनें जडीत जोहार कोंदन केल्या खाशा ॥ आंधक दिसते तेज नाहीं ऐणे महाल आरशा ॥ विठ्ठल माझा तोही कोपला खचित जाली निराशा ॥ काय केली तुझी चोरी पदरीं घाला जगन्निवासा ॥ आस करूं कोणा तुजवीण सांभाळीना कोणी ॥ ३ ॥

मान्य करिना आर्ज विठ्ठल फारच उदास जाहाली ॥ जाते ग बायानों फिरत पंढरीच्या भोवताली ॥ संताचे पदिं मस्तक ठेउन चित्तवृत्ती मन घाली ॥ च्यार दिवस सुख आठविन पतीचे भजन

करिन सुरताली ॥ नको घाबरी होऊं एकांतीं जासुदजोडी आली ॥ खुशाल जाहाली अंत:करणीं भेटला तिचा वाल्ही ॥ सगनभाऊ गुण गाती चाहाती ॥ गुणीजन गुण पाहुनी नवी । चाल रंग बहार रसीली तऱ्हतऱ्हेच्या बानीं ॥ माझें मन भासतें पतीविण झोंप लागेना नयनीं ॥ ४ ॥

---

# किने घुंगर बजाया

( राग कल्याणी )

चाल--किने मुरली बजाई गरर--

होनाजी

किने घुंगुर बजाया छननन छननन आवाज आया ॥ धृ ॥

आजी जाती आपने पिहूं कूं मिलने ज्याती ॥ आज ज्याती आशक मतवाला जीका साती ॥ चांदणी रात नहि सरमाती ॥ बीदीसीस फळ चमक बत लाती ॥ बाके वाळ पुरावे मोती ॥ भांग जमाच्या ॥ १ ॥

विष के मारे लुटपुट प्यारे ॥ ज्या कें पिहु कें आंगनमें भाले ॥ ईशारत करके लाल पुकारे ॥ थाप दरवाजा उपर मारी ॥ मजकूं घर खावंदकी मोरी ॥ उठोजी मिया ॥ २ ॥

मोहन का सुनले मिठा आवाजा भारी आवाजा ॥ कुचलेकर खोल दरवाजा ॥ पितमकूं देखे तर कलीजा ॥ हिंदुपद दखन कां राजा ॥ आर्जी सुनतेव आजी महाराजा ॥ दर्शन बताया ॥ ३ ॥

सामने होवे अकबर काई ॥ छाती उमर गेंद भरकाई ॥ मिलाफ होके चिराक सरकाई ॥ करकर चुरिया जदत्तर काई ॥ सगनभाऊ कहे हुई भरपाई ॥ जुटी माया ॥ ४ ॥

———

# सगनभाऊचे पोवाडे

## पानपतचा पोवाडा

चाल—तुझी काळजी मला राजसा जामुद पिटवा इथुन ॥

**सगन**

भाऊ नाना तलवार धरूनागेले गिलिच्यावर चढाई करून ॥ध्रु०॥
सवाई बाजीराव पेशवे पुण्यवान प्रधानानाना भाऊ गादीवर शूर जन्मले जैसे अर्जुन ॥ शहर पुणें वसविलें मोहरा पुनळयाला नाहीं कांहीं उणें । चमके नंगी तलवार सैन्य हें सारें लष्कर पाहून ॥ गर्व कोंदला फार जसा लंकापति रावण । होणासारखें प्राक्तनीं कैसें लिहालें ब्रह्मयानें ॥ (चाल) ॥ बोलवून अवघे वजीर । सजवून या सभा सदर ॥ मग कैसा केला विचार । पत्रें लिहिलीं एकच तार ॥ अष्टप्रधान मानकरी सारे । जरी पटका ऐशीं हजार ॥ आले मल्हारराव होळकर । फौजेमधें कुलअकत्यार ॥ पलटणी उभ्या तय्यार । शिंदेशाई तोफेच्या बहार ॥ बारा हजार बाणांची कतार । चाळीस हजार भोसले नागपुरकर ॥ विस हजार आरबसुमार । तीस हजार हपशी बरोबर ॥ अठरापगड लोक सारे । आपल्याला मिनलीवर ॥ चाल ॥ चाळीस हजार पठाण नित्य तेग्रे चमकती । अर्बुज जात ही खंदी फिरे भोंवती ॥ सिंत्र जाट रोहिला नाहीं त्याला गणती । घोरपडे नाईक निंबाळकर नौबद् वाजती ॥ घाटगे मोहिते माने पाटणकर झुकती । ढालेशी ढाल भिडे जरिपटक्याचा हत्ती ॥ चाळीस हजार सडक करनाटक चमकती । हे मानकरी भाऊचे ऐसे दुनया बोलती ॥ एक एका बरोबर ऐसे पतके किती । बारा भाई जमले नाहीं त्यांची गणती ॥ सांडणी स्वाराची डांक फिरे भोंवती । अशी जमाबंदी करून ॥ भाऊ नाना०...॥ १ ॥

शाण्णवकुळींचे भूपाळ सारे मानकरी बरोबर। धायगुंडे पायगुंडे मोरे शेडगे पांढरे महशूर ॥ खलाटे लोखंडे भिसे वाघमोडे आणिक हटकर । शेळके बोळके काळे खचल खराडे नाहीं त्यांला सुमार ॥ शिरके महाडिक मिसाळ पिसाळ वांघे बरगे आहेत बरोबर । जाधव धुळवपोळ चवाण डफळे भोंसले गुजर रणशूर ॥ लिगडे कदम फडतारे घाडगे यादव थोरात मापकर । आंगळे निंगले सेवाळे शितोळे रणदिवे वाबळे खळदकर ॥ गाढवे रसाळे जगताप जगदाळे काकडे काटकर । हे सारे सुभे भाऊचे उभे आपल्याला बाजूवर ॥ चाल ॥ चाळीस हजार करवल जमले । सोडिले शिरावर समले ॥ रास्ते पटवर्धन गमले । ढमढेरे तळेकर तुमले ॥ आले पंत जागा त्यानीं आंखली । नाना फौज पाहतांना चकले ॥ दलबादल डेरे दिले । नगारखाने झडूं लागले ॥ गोसावी त्यामधिं वायले । फकड ते सोटेवाले ॥ मग लमाण कितीक आले। बावन पागा फारच झाले ॥ चाल ॥ कोतवालघोडे सजविले श्यामकर्ण । भरगच्ची हत्तीवर झुला घाली हौसेनें ॥ हौदे अंबारी आयन्याचें तारांगणें । आघाडिला चालली लगी भडक निशाणें ॥ सूत्रनाळी जंबुर उंटावर राखुन । खंडा पट्टा सुरे तिरकमठा कमान लावून ॥ ढाल फिरंग नवाजखाणी निशंग गगन लष्करी खूण । पिस्तुल बंदुक चकमक चमके संगीन ॥ कडाबीन बकमार याची खूण । राहिले एकदील खुण करून ॥ चाले फौज काय पाहतां दुरून । भाऊ नाना० ॥ २ ॥

आंगळे इंगळे शेराळे शिताळे रणदिवे वाखाळे खळटकर । गाढवे रसाळे सोनवणे जगताप जगदाळे काकडे काटकर । बोबडे दुवल मोहिते सिंगाडे सांवत खिरसागर । गोडसे निकम दुधे फाळके धुमाळ गळेर वालकर तोरदळकर ॥ ॥ ( चाल ) कितुरकर देसाई हातीं भाले । हैदराबादकर मोंगल आले ॥ मंत्री चिटणीस नरगंदवाले कोकटकर महाराज खटावबाले ॥ कुडकवाल्यांनीं खजिने पाठविले । गोंवेकर फरास पुढें गेले ॥ ( चाल ) जमराडे

सरदार ह्यांवरे शूर अतिरथी । लई धनगर शाणव कुळींचे मराठे होती ॥ हत्यार जमई जमदाड माडु घेऊन हातीं। बिचवा ह्या वांगी गुरमुज सांग सोटा बरची फेंकती ॥ सुरसेप दारूचे केप धुंद लढयेती । फसत बालमपेंच खुदचार मार लई होती । देणें महा राजांचे परिपूर्ण ॥ भाऊ नाना० ॥ ३ ॥

नाना भाऊनीं विचार केला फौजा पहाव्या म्हणून । स्वारी निघाली बाहेर पर्वतीच्या दर्शनाकारणें ॥ डंके झाले चहूंकडून घोड्यावर ठेविले जीन । भले भले सरदार चालती, आपआपल्या मिसलीनें ॥ पेंढार पुढें मागें तोफा चालल्या दारूगोळा बार भरून ॥ हत्तीवर सूत्रनाळ उंटावर बाण भरून ॥ बारा हजार उंटावर बाणांच्या कैच्या मागें चाले दवा धरून ॥ करावीन बकमार आरब सिंध रोहिले गोलचे गोल भरून ॥ करबळवाले एकांडे पन्नास हजार रहदारी करून ॥ बासडीवाले धनगर निवडक बाजूवर ठरून ( ॥ चाल ) ॥ पुढें होळकर चालला । शिंदेशाही नाहीं गणतीला ॥ साडेसातशे कोतवाल सजविला । त्याला भरगच्ची झुला ॥ सहा हजार तोफा बार भरला । पायदळ निशाण कडक पुढें उडाला ॥ चार हजार सोटेवाला । सात हजार बलुमवाला । गोलचा गोल नाईक आला । मागें फौज करनाटकवाला । बाराभाईचा घोडा मग भरला । बावन पागा बारगीर जमला ॥ माय मोर्तब आले गणतीला । साठ मानकरी मोरचलवाला ॥ ( चाल)॥ स्वारीचा थाट एकचित्तें झाला बरा । होणार टळेना ब्रह्म्याच्या अक्षरां ॥ रंगाविले हत्ती पाखरा भरजरी जरा । अंबारी साडेसातशें मोती झालरा ॥ नाना भाऊनीं करून पोषाग चंदेरी तऱ्हा । गळे कंठी पाच शिरपेंच मोत्यांचा तुरा ॥ कपाळीं केशर टिळा चंद्र दुसरा । हौद्यांत बसून शाहीचा घेत मुजरा ॥ ( चाल ) ॥ तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा । संगे झडती चौघडे शिंगें तुतारा ॥ पर्वतीचें दर्शन घेऊन येत माघारा । फौजेकडे पाहतो भाऊ फिरून माघारा ॥ नऊ लाख सैन्य एकदिल घोडा सारा । शहर पुण्यास मुजरा करून । भाऊ नाना० ॥ ४ ॥

बाण बालम जिरिटोप बकतारे चाळीस हजार गणतीला। जामदारखाने फोडून पैसा साऱ्या सेनेशी वाटिला। कडीतोडे पोषाग कंट्या दिल्या झाडून फौजेला। शांत केली चित्तवृत्ती मग मनसुबा काढिला॥हत्ती लंढाविले गिलचे पेशवे यश आले शत्रूला॥ राघोबादादा म्हणे भाऊशी प्रश्न पाहूं चांगला॥ नाहीं ऐकलें पुढें होणार न टळे कोणाला। दख्खनची सौभाग्य गळसरी तुटली त्या समयाला॥ समस्तांनीं अर्जाविले भाऊ ऐकेना सर्व मंडळीला। चाल केली गिलच्यावर डंके वाजवीत चालला॥ (चाल)॥ धरिली दिल्लीची वाट। सातपुड्याची झाडी दाट। अजिंठ्याचा उतरला घाट। बंडावे मोडले वाट। नऊशें कोस मारवाड नीट। त्यानें जाऊन घेतली भेट। दिल्ली जमाबंदी चट। बादशहानें आणविला जाट। लखनोरचे नबाब जबघाट। दीड-लाख फौजेचा थाट। बादशहाने आणविला जाट। सेना जमली आटोकाट॥ (चाल)॥ धारचे पवार जयपूर उदे-पुर वाला। रातोरात पोंचली डांक सरंजामाला॥ नानाभाऊनीं जाऊन यमुनेवर डेरा दिला। भिडाविले मोर्चे लढती किल्ल्याला किल्लेदार बडा रणशूर मार लाविला। बारा हजार तोफा सरबत्ती दिली तोफेला। मोर्चे गढती फौज लढती केली हला। घेतला किल्ला जबरदस्त बादशहा केला। भाऊची खराबी गणीत नाहीं जखमेला। भाऊ दिलगिर फार दिला हुकूम तोफेला॥ दिल्लींत माईना मुडदा गंज पडला। धिटाई करून हल्ला चढविला॥ दिल्ली शहर घेतलें सर करून॥ भाऊ नाना०॥ ५॥

आटोकाट जमले पठाण कुंजपुऱ्यास साठ हजार। दुहेरी तोफा लाविल्या पुढें कोसाचा मार॥ कुंजपुरा येईना हातीं भाऊ जाहले मनीं दिलगिर। बोलावुन पेंढारी मग त्यांनीं काढला विचार॥ दिल्ली सोडावी डावी उदेपूर वेढावें चहुफेर। होळकराशीं केला हुकूम बाण मग सोडी नाकपूरकर। आतां फराशीस पुढें गल बारनाळा भरगोळ्यांचा मार। पेंढाऱ्यांनीं वेट

उठविला तोफखान्यासमोर ॥ चाल ॥ जागोजाग छबिने भाऊचे । राऊत पायदळाचे ॥ तट पाडिले किल्ल्याचे । फार सैन्य पडले भाऊचे ॥ चढले निशाण शिंद्यांचें । पाट वाहती बहु रक्ताचे ॥ एक लाख मनुष्य दिल्लीचे घालाल पडले जखमाचे ॥ बारा हजार पेंढार भाल्याचें । लूट मुभा दिल्लीची ॥ चाल ॥ फोडिले तक्त दिल्लीचें खजिना काढिला । कुमकेस घेतली फौज कुच मग केला॥ आले नाना भाऊ धावत हिंदुस्थानाला । लखनोरचा नबाव रातोरात पळून गेला ॥ लुटले शहर सारें आग्र्यावर ढाला दिल्या । राजा रणजीत जाट लाहोरवाला ॥ चवथाई दिली भरतपुरवाला मिळाला । लिहून धाडिलें पत्र रुमशामाला ॥ चवदाशे कोस घोडा अटकेस पाणी पाजला । रातोरात डाक गेली गिलचाला ॥ आले वकील सलाम करून । भाऊ नाना० ॥ ६ ॥

वकील उभे हात जोडून बोलती नाना भाऊकारण । लँब धाडली तुम्हा खर्च झाला पैसा देईन ॥ पुण्याप्रती राज्य करावें दिल्ली अटकेपासून । क्रोध आला भाऊशीं नऊ कोट रुपये द्यावे धाडून ॥ चवदाशे कोस आलों पुढें चवदाशें कोस जाईन । इस्तंबूल या किल्ला मुलूख रुमशामचा पाहिन ॥ दोन्ही हात बांधून शरण यावें तेव्हां परतून जाईन । गिलचा बोले कोणी आशा ठेविली आलें मरण ॥ फेर पत्र पाठविलें दातीं धरून यावें तृण ॥चाल॥ पत्र वाची त्या वेळेशीं । कळविलें अवघ्या फौजेशीं ॥ भाऊ बोले तेव्हां नानाशीं । तीस हजार फौज घ्या खाशी ॥ गोविंदराव बुंदेले बनशी । दोन पतके बरोबर खासे ॥ केला रवाना त्या दिवशीं । दाणा वैरण आणावयाशीं ॥ ढाला दिल्या आग्र्यावर त्या दिवशीं । झाला हुकूम खजिना आणावयाशीं ॥ खजिने भरले छकड्याशीं । रातोरात डाक गिलचाशीं ॥ आली चालून मुकामाशीं । दहा हजार फौजेशी ॥ शिरें पाठविलीं भाऊशी । भाऊ म्हणे कोणे एकाशीं । नसे नऊ लाख माझे पाशा ॥ चाल ॥ गिलचाची फौज आली चालून भाऊवर । भाऊ हटेना लढणार तोही

रणशूर ॥ झाला हातघाई दिवस पहिला सोमवार । आरबांनीं केली गर्दी गोळी अपार ॥ गिलच्याचे पडले मुडदे पळतां वेजार । धाडिले पत्र रुमाला गनीम शिरजोर ॥ बडा खंदा ब्राह्मण नऊ लक्ष फौज रणशूर । पानपतावर छावण्या खंदकाबाहेर । आम्ही तरी ना येऊं हातीं घेतले शिर । धाडा सडी फौज खाशी करून तय्यार ॥ चार दस्ते घोडा पाठवा एक दिलसारे । धाडा खर्ची खजिना भरून ॥ भाऊ नाना० ॥ ७ ॥

बादशहानें पत्र वाचतां झाले मनिं दिलगीर । आऊक्ष दोरी तुटली आम्हाउर कोपला ईश्वर ॥ इंस्तंबुल मागता किल्ला चवथाई द्यावी कोठवर । मरून खरे होऊं परंतु ना जाऊं त्याचे हार ॥ सांडणीस्वार फाकिला कंधार पंजाब पंचीन बहाद्दर । वजीर बोलावुन विडे दिले गिलच्यांस केलीं वस्त्रें ॥ फत्ते करा तलवार बक्षिसा देईन मुलुख महामूरागादीचें नांव राखा सध्यां देईन पैसा मुबलक फार ॥ चाल ॥ घोडा चार दस्ते बोलाविला । दिला पोपाग पिंवळा शेला ॥ दुराण्या राऊत बोलाविला । बादशहानें शिरीं हात ठेविला ॥ भले भले शिपाई अघाडिला । शहराबाहेर डेरा दिला ॥ सहा हजार तोफ बार भरला । पुढें चालतां कडक उसळला ॥ हिरवें निशाण हिरव्या ढाला । फौजचा ढग जसा वळला ॥ त्या दिवशीं मुक्काम केला । बोलविले अस्तरीला ॥ आम्ही जातों रणघरला । आतां आले रांडपण तुजला ॥ चाल ॥ तोडून गरसळीं फोडून हातची कांकणें । झाली निरवानिरवी शिरीं बाशिंग बांधुन ॥ पैजेचे विडे उचलीले यश घेऊन । चार दस्त पडतील त्या दिवशीं रूम सोडीन ॥ बादशहास बोलती कधीं ना येऊ परतून । शंभर कोट रुपये खर्ची देईन धाडून ॥ अथवा जाईन मरून ॥ भाऊ नाना० ॥ ८ ॥

अकराजणांची कुंपणि अकराशेंचें एक पलटण ॥ अकरा पलटणाचा एक कंपू अकरा कंपूचे एक दस्तन ॥ अशीं दोन दस्त ठेविलीं रुमाच्या गार्दाला राखण । चारदस्त सरंजाम नदी समजी

आले उतरून ॥ पिवळे करून पोषाक नवरे तळ हातांत शिर घेऊन । धाडिले वकील गिलच्यानीं मसुदे बोलाया कारणें ॥ नाहीं ठरले बोलणें भाऊसाहेबाशीं गर्व दारुण । वकील आले माघारे वृत्तांत कळविला जाऊन ॥ चाल ॥ गिलच्यानी कावा केला । तीन कोस सोडून भाऊला ॥ भंवता वेढा घातला । रस्ता चालू देइना झाला ॥ वाणी उद्मी बंद केला । गौळी माळी तो राहिला ॥ तेली तांबोळी हलवायाला । कोणी जाऊं देइना त्याला ॥ असा तीन महीने दम धरिला । पुढें धारण आली फौजेला ॥ अदपाव दाणे रुपयाला खरा खोटा घ्या दाखला ॥ तेल तूप मीठ मिरचीचा तोटा पडला । नीर देही अंतकाळ झाला ॥ चाल ॥ नाना भाऊ बसून डेऱ्यात करती विचार । अन्न दृष्टी पडना झाले खोबरें ॥ पाण्याची किमत नऊ रुपयास झाले शेर । निमें अन्न निमी शाडू भक्षिती लोक सारे ॥ पोटाचे महदुःख सोसेना तिळभर । पोटाविण ओढून काचा वांधी कंबर ॥ म्हणे भांग तमाखु अफीम राहिली दूर । भाऊशी बोलती मिळुन अवघे लष्कर ॥ नेऊन घाला गिलच्यांवर झालो निष्ठुर । हत्ती घोडे मरती ढाणावर ॥ कां घेतां रांडपण घरीं बसून । भाऊ नाना० ॥ ९ ॥

गिलच्यांनीं हुकमत करून भाऊ वेढिला बहुत युक्तिनें । जठराग्नि चेतला खवळला व्याघ्र पंचानन ॥ झांगड नौबत वाजती दणादण भेरे वाजे संगीन । डंके झाले पताकाच्या घोड्यावरतीं ठेविलें जीन ॥ फौजा झाल्या तयार निष्ठुर कर वळाच्या मैदाना । चोर डाक एक ही होती गिलचांची नाहीं कळलें संधान । गिलचा झाला घाबरा आणि वेढा उठविला जलदिनें ॥ दोनी दळें झालीं तयार त्यावेळे करतां नारायण ॥ आदितवारीं लढाई नेमली दस्ते आले जलदिनें । भाऊस वातमी कळली जरिपटका गेला चालून ॥ ( चाल ) ॥ गिलच्यांनीं रणखांब पूजीला । भाऊशीं वर्तमान कळला । काय पहातां गनीम सांपडला । एकदांच हरहर केला ॥ रोहिले आघाडी जे जाला कडाबिन सुचनाला ॥ ऐशी

हजार होळकर भाला । शिंद्यांना मार खूप दिला ॥ बाण सुटती-तीरकमानीला । अरब हपशी तो रोहिला ॥ गोसावी धुंदकत चा-लला ॥ करवलानें घोडा चमकाविला ॥ बाराभाईच्या मेंडगावर ढाला ॥ फौजेचा बंद मग तुटला ॥ भाऊसाहेब अंबारींत डुला । दादू महातानें हत्ती पुढें नेला । आंदु जडियले हत्तीला ॥ तीरक-मान हत्ती धरला ॥ पाडव दळीं विमोरग आला ॥का पहातां वीर खवळिला ॥ दिली सरबत्ती तोफेला ॥ नऊ हजार गोळा उडाला ॥ ॥ (चाल ) ॥ तासे मर्फे ते तंबूर किती वाजती । कर्णे कितीएक रणवहिरी करिती ॥ गिलच्यांच्या तोफा कुलपी गोळे गर्जती ॥ धूम्र कोट बाण जशी ढगांत वीज चमकती । दणादण मेरू मंडळ धरणी कांपती॥बारा हजार पालखी भाऊची झाली रिती।तीन लाख घोडा गर्द जरीपटक्याचा हत्ती ॥ एशीहजार होळकर गर्दी नाहीं दिसती ॥ पायदळाचे गोळे जागोजाग पडले किती । सोकला कंठ मग पाणी पाणी बोलती ॥ जखमांची नाहीं गणती कबंध नाचती । स्वर्गाचे देव पाहती वर्णिती अमरावती ॥ गगनीं झाकले सूर्य चंद्र भिऊन ॥ भाऊ नाना० ॥ १० ॥

गगनीं झाकल सूर्यचंद्र मग पडला अंधकार । गलिमानें पुर-विली पाठ भाउ हटेना तो रणशूर । सोनपतावर लढाई भाऊ अंबारींत कमान तीर ॥ बाणे बंदुकिचे फेर झडती तोफेचे गोळे पडे जसे गार ॥ गोळयासरसा भाऊ उडाला दादू महात चकाचूर॥ बापलेक ओळखेना धरणीमाय जागा देईना अल्प जर । नानासाहे-बाला डांक आली ते गेले हामी सादर । झाले घोड्यावर स्वार बाईस कळिले धरला पदर ॥ बोले गोपिकाबाई पुण्याचे राज्य कोण करणार । भाऊसाहेब गेले आम्ही तरी काय राहुन करणार ब्राह्मणी राज्य पेशवाई बुडाली असें नाहीं होणार ॥ ........ ॥ ( चाल ) पैजेचा विडा उचलिला । सारी शाही पाहती नानाला ॥ भाला कटार सूर्य दाबला । दोन लाख घोडा बरोबरीला ॥ रणा-मध्यें जाउन शिरला । झाली चकमक एकच हल्ला ॥ चाळीस

हजार जिरेटोपवाला । नानापाशीं कत्तल झाला ॥ होळकरानें फितवा केला ॥ हें ठाऊक नाहीं नानाला वैऱ्यांनीं वैर साधिला । मग जखमा चढल्या नानाला ॥ जसा भीष्म कर्ण युद्धाला ॥ मुरद ! पाईना धरणीला । अरब हपशीपत्रे रोहिला । तो घारीवाणी उडाला ॥ घोड्याहून खालीं आला । लढण्याचा हेत नाहिं पुरला ॥ नाना पडला धर मग सुटला । गिलच्यानें मार खप केला ॥ ( चाल ) ॥ खंदकांत माईना लोक उंट घोडे सारे । गिलच्यांचा एक दस्त यश रणशूर ॥ नऊ लाखांतले सातशें उरले सारे । तोफा बंदुका पडल्या सुने दिसती डेरे ॥ मोहरा पुतळ्या रुपयांचे जागोजाग पडले ढिगारे ॥ पडलेल्या फौजेचे मागें कोण घेणार ॥ हत्ती उंट मोकळे घोड्यांचे खिल्लार । कोणी लूट घेईना पळता जीव वेजार ॥ बेले दाही दिशावर पळून ॥ भाऊ नाना० ॥ ११ ॥

शके सोळाशें पासष्ट फाल्गून वद्य षष्ठी आदितवार । नऊ रात्र नऊ दिवस लढाई मग फिरले माघारे ॥ सातशांनीं धरली वाट पुण्याची निर्मान्य लष्कर । बेदड घालती छापे वाट चालेना तिळभर ॥ पुढें बिकट वारी कैसा तारील परमेश्वर । असे सांडाव हेत आले अटक अतरून नऊ कोसावर ॥ ( चाल ) ॥ तिथून अवघे फुटले पुण्याचे रस्ते भुलले । फारादिसा भुलीमध्यें गुंगले ॥ नऊ खंड फिरतां चकले । अन्नाविण वाळुन सुकले ॥ भक्षिती झाडांचे पाले । गोसावी किती एक झाले ॥ तंबू हातीं घेतले । किती रामेश्वराकडे झुकले ॥ काशींचे रस्ते धरले । या रितीनें सैन्य खपलें ॥ दैवांचे पुण्याशीं आले । लाखोटे सदरेवर पडले ॥ दुःखाचे सागर फुटले । ... ... .... ... ॥ ( चाल ) ॥ लाखोटे वाचिता झाले अवघे घाबरे । नानाभाऊ बुडाले पुण्यास आली खबर ॥ नानाभाऊ बुडाले परंतु लौकिक दुनियादर नवलाख बांगडी फुटली असला हाहाकार ॥ दक्षिण बुडाला सती पडल्या महामूर । श्रीमंताच्या तक्तापाशीं भलेभले मनसुबीदार ॥ स्थापिले गादीवर माध-

वराव नेणार । सोन्याची जळली भट्टी उरले खापर ॥ शाहु शत्र-पतिचे देणें सांब आवतार । गातो सगनभाऊ ठिकाणा शाहुनगर॥ गातो फत्तेजगं पवाडा करून । भाऊनाना. ॥ १२ ॥



# खडकीची लढाई

दक्षणच्या पेशवाशी घाला कधि नव्हता आला । गंगाधर शास्त्र्यावरून राज्याचा नाश झाला ॥ धृ० ॥ गंगाधरशास्त्री मारले पंढरपुरांत । चोरबातमी गेली इंग्रजांच्या घरांत । तेथुनि रचिला कलंकी ऐका आश्चर्याची मात । त्र्यंबकजी डेंगळे हवालीं करून झाले शांत । दोन दिशी वाद मिटला ठेविले टाण्यांत । पुढें व्हायाचे पळून गेले सहाव्या माहिन्यांत । इंग्रजांच्या पहाऱ्यातुन असा कोण गेला ॥ १ ॥

कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठीं । एक महिन्याचा वायदा मसलत केली उफराटी । वसई सुभा दिला रे देवा आड-केली ताटीं । कसा तरी जिव वांचो पडल्या दुष्टांच्या गांठी । बाबासाहेब गेले पंढरिला विठ्ठलाच्या भेटी । उजवें फुल द्यावें आम्हां माहुलिच्या कांठीं । गोविंदराव काळयानें मनसुबा पहा कैसा केला ॥ २ ॥

बापुगोखले मुळींच ऐका बेटावर गेले । बेट जाळून निघुनशानें खडकीवर आले । दोघांचे मोर्चे भिडले आकाश कडकडलें । बापु-गोखले जाऊनशानें तोफेवर पडले । टोपीवाल्याची करडी झाली लढाईवान पडला । लहान थोर जन रणभूमीशीं युद्धास आला । दोहो सैन्यांचा बहुतसा चेंदा तो झाला ॥ ३ ॥

दोन पलटणी येऊन पुण्यावर गारपिरीं भरल्या । युक्ति युक्तिनें उठवून लावितां खडकीर ठरल्या । आश्विन महिना एकादशी तल-वारी झडल्या । तेराव्या दिसचा समाचार ऐकुन घ्या दाखला । सत्राशें एकुणचाळीस ईश्वरी नामसंवत्सराला ॥ ४ ॥

लाख फौजेचा जमाव झाला श्रीमंतांपाशीं । रणभूमीवर येऊन पडल्या तोफांच्या राशी । अलिपष्टनसाहेब स्मिथसाहेब आले रागाशीं । सिंधुराच्या टेकडीवर दिल्या तोफांच्या राशी । अलिप-ष्टन् साहेबाचा हुकूम तो लइ करडा झाला ॥ ५ ॥

करनल साहेब होते पलटणींत । आले धाऊन खडकीच्या मैदानांत । लढाई करून बहुत केली मात रंजुक झडत । पांचेचा हिरा दडेना वाटोवाटी चंद्र गगनांत । बापु गोखल्या सकळ सुरवर स्तविती रणांत । तीन लाख फौज पळून गेली बापु गोखला राहिला रणांत । युद्ध केलें त्यानें युद्ध केलें बहुत । बाबासाहेब विश्वास देऊन माहुलीस गेला । बापु गोखला लढता सवाप्रहर दिवस आला ॥ ६ ॥

दळणासरसे किडे रगडले रडती नरनारी । लेंकराला माय विसरली कसा ईश्वर तारी । आधीं गेले ते पार पडले पुण्याच्या पारीं । पुण्यावरती चढले झेंडे केली वारासारी । जो येतो तो लढतो हातामधीं भाला घेऊनी । सगनभाऊ म्हणे ऐशी ईश्वराची करणी । बिविछन म्हणे चंद्रसूर्याशीं कलंक लागला ॥ ७ ॥

---

# प्रतापसिंह महाराजावर पोवाडा

मुळापासून चाल झाली कुठे दिसेना अंतर । बाळासाहेब हुशार करकट्टे लढणेवाले फार ॥ इंग्रजानीं घेतला मुलुख चालून आले दक्षणेवर । कोलापुरवाल्याशीं जिंकिलें लढण्यास टिकेना कोणी फार । शहरामध्यें द्रव्य फिरविलें राज्य घेतलें हातावर । सारें शहर फिरून आला डेरा दिला पवय नाक्यावर । साहेबलोकांनीं देउनी ताजीमा पहिली खुर्ची केली मोहरे । मनामधिं कांहीं भीति आणु नये आपला चालला एकच विचार । चौदा पेठ्याचें राज्य करावें आह्मास आनंद फार ॥ १ ॥

बुवासाहेब बाळासाहेब मारून टाकावें जलदिनें फार । आपासाहेब मागून बोलता झाला भाऊबंद कसे मी मारूं ॥ आपल्या हातानें घ्यावा प्राण मारा सांगतों किल्यावर । इंग्रजानी तयार तोफा आणल्या पवय नाक्यावर जलदिने हा बार भरून हल्ला उठविला किल्यावर । शहरामधिं झाली चलविचल बुवासाहेबास दहशत पडली फार ॥ २ ॥

बाळासाहेबास आला क्रोध लढाईची करून तयारी । सारें लष्कर शिबंदिशीं जलदी उठवी फार ॥ बुवासाहेबास कळली बातमी हात जोडून बाळासाहेब मोहरें । आग लागो द्या लढण्याला इंग्रज येईना हार ॥ सातारकिल्ला प्रताप खूपे जिंकिला इंग्रजानीं कैद केले । बाळासाहेब बुवासाहेबास जलदिनें निंबावर नेलें । अंबारींत बंधु बैसले झालरी लाविल्या हत्तीला । इंग्रजानीं जिंकून सातारा आपला अंमल बसविला । बाळासाहेबास वनवास ईश्वरान दिला । अवघे मानकरी येति भेटिला असा राजा नाहि होणार सातान्याला ॥ ३ ॥

निंबावरती डेरा दिला बारा दिवस वनवास कंठिला । पुन्हा तेथुन निघून चालले पुण्यक्षेत्र काशिला ॥ एन जंगलामधिं राजा जन्मला जंगली राजा नाम पावला । सगन भाऊ गर्जे सभेमध्यें यानें पवाडा केला । मोठ्या मोठ्याची कीर्त करितो अशी चाल

होइना कोणाला । बुवासाहेब बाळासाहेब यांनीं धास्ती घालून व्यर्थ प्राण सोडला । अवघ्या राज्याची हीच गती पुकार झाला सर्वांना । अवघे राज्य करीना लढाई खंडणी देती बहादुर इंग्रजाला ॥ ४ ॥

---

बाळा--बहिरूकृत

# लावण्या व पोवाडे छापत आहेत

आणि

सगनभाऊचा दुसरा भागही लौकरच प्रसिद्ध होईल.